# प्रस्तावना

या छोटया पुस्तकांत लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी याच्या राजकीय नेतृत्वासंबंधी आणि तत्त्वज्ञानासंबंधी निरनिराळया वेळीं लिहिलेले माझे लेख एकत्र केलेले आहेत. पंचवीस वर्षांपूर्वी लोकमान्य टिळक निवर्तले आणि महात्मा गांधींनी राष्ट्रसभेचे धुरीणत्व स्वीकारलें. महात्मा गांधीनीं अनत्याचारी असहकार, सविनय कायदेभंग आणि सत्याग्रह यांसंबंधी जें तत्त्वज्ञान भारतापुढे व जगापुढें मांडण्यास सुरुवात केली त्याची तात्त्विक व वैचारिक बैठक राजकीय व्यवहाराच्या इतिहासांत त्या वेळी अगदी अभिनव अशी भासली; असें असूनहि राष्ट्रसभेच्या व विशेषतः तिच्यांतील राष्ट्रीय पक्षाच्या धोरणाचा विकास करण्याच्या दृष्टीनें महात्मा गांधींचें राजकीय नेतृत्व व धोरण स्वीकारणे त्या वेळी राष्ट्रसभेला आवश्यक होतें. इतकेंच नाही, तर ऐतिहासिक विकासाच्या दृष्टीनें विचार केल्यास महात्मा गांधीनी जो असहकारयोग त्या वेळीं नव्यानें हिंदी जनतेपुढें मांडला, तो व्यवहारदृष्टया लोकमान्य टिळकप्रभृति पूर्वींच्या पिढीतील राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं पुरस्कारिलेल्या बहिष्कारयोगाचाच एक प्रकार होता, ही गोष्ट या लेखसंग्रहांत वारंवार वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केलेला आहे. गांधीजींनीं टिळकांचें राजकारण पुढें चालविलें आणि त्यांनीं दाखवून दिलेल्या धोरणानेंच गांधीयुगात राष्ट्रसभा आपली प्रगति करीत आहे, हें लोकांना पटविण्यासाठी या संग्रहांतील अनेक लेख लिहिलेले आहेत. राष्ट्रसभा ही एक विकासशील क्रान्तिकारक संस्था आहे. टिळकांच्या नेतृत्वाखालीं तिचा विकास झाला, आणि त्यानंतरचा विकास महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली होणार आहे, असा या लेखांतील प्रतिपादनाचा रोख आहे. असें असलें, तरी केवळ तात्त्विक दृष्टीनें महात्मा गांधी व लोकमान्य टिळक यांचे दृष्टिकोन

अगदी एकरूप आहेत असें मात्र या लेखातून प्रतिपादिलेलें आढळणार नाहीं. टिळकपक्षाच्या नांवानें गांधीयुगांतील राष्ट्रसभेला विरोध करण्याचा प्रयत्न जे करीत होते, त्यांचा तो प्रयत्न खोडून काढण्याच्या दृष्टीनें हे लेख लिहिले असल्या-मुळे टिळकांच्या व गांधींच्या तात्त्विक भूमिकेंतील भेदांवर विशेष भर देण्यांत आलेला नाही. तरीहि हा भेद मुळीच नाही असे मात्र त्यात कोठेंहि म्हटलेले नाही. तत्त्वज्ञानासबधीं म्हणून जे लेख या संग्रहांत प्रसिद्ध केले आहेत त्यांत दोघांच्या तात्त्विक भूमिकेतील साम्य-विरोध अथवा भेदाभेद स्पष्टपणें नमूद केलेले आहेत. राजकीय धोरण असो किंवा तत्त्वज्ञान असो, दोन्हीहि बाबतीत महात्मा गांधीचे धोरण टिळकाच्या धोरणाशीं पूर्णपणे विसगत आहे असे म्हणणारांचा पक्ष खोडून काढून गांधीचें धोरण व तत्त्वज्ञान टिळकाच्या धोरणाचा व तत्त्वज्ञानाचा विकास अथवा त्याची पुढील पायरी होऊं शकते, हें दाखवून देणें हाच यांपैकीं बहुतेक लेखांचा हेतु आहे तसेंच महात्मा गांधींच्या प्रत्यक्ष नेतृत्वाच्या काळा-नंतर राष्ट्रसभेला समाजवादी धोरण स्वीकारावें लागेल आणि तिनें तें धोरण स्वीकारलें तरीहि तिच्यावर सत्याग्रही तत्त्वज्ञानाचे व नेतृत्वाचे जे सस्कार महात्मा गांधींनीं केलेले आहेत, ते नष्ट न होतां तिच्या समाजवादाला त्या संस्कारां मुळें सत्याग्रही स्वरूप येत राहील, याचेंहि दिग्दर्शन या संग्रहांतील एक-दोन लेखांत स्पष्टपणें केलेलें आहे. याशिवाय, सत्याग्रह आणि समाजवाद या दोनहि तत्त्वज्ञानांसंबंधीं माझे जे वैयक्तिक विचार आहेत, त्या विचारावर १९४२ सालांतील क्रान्तिकारक आंदोलनाचा काय परिणाम झाला, व त्या वेळी मी बंदिवासात असतांना माझ्या एकंदर विचारांत कसकशी वाढ होत गेली, तें दाखवून देणारा असाहि एक लेख या सग्रहांत ग्रथित केलेला आहे. तात्पर्य, लो. टिळकांचे धोरण व तत्त्वज्ञान, महात्मा गाधींचे राजकीय व्यवहार व त्याची धार्मिक निष्ठा, तसेंच, सत्याग्रह व समाजवाद यांसंबंधीचे व त्याच्या हिंदी राजकारणांतील स्थानाचे विवेचन या लेखसग्रहांत केलेलें वाचकांस आढळेल. आपल्या राष्ट्रांतील राजकीय घडामोडीमागील तात्त्विक अधिष्ठान समजून घेऊन, त्यांचा अभ्यास करण्याची ज्याची इच्छा असेल, अशा जिज्ञासूवर्गाला या छोट्या पुस्तकाचा कांही उपयोग होईल, व त्यांना या विषयाचा विचार करण्याचा माझा विशिष्ट दृष्टिकोन समजू शकेल, अशी मला आशा आहे. जर विद्यार्थिवर्गाला या संग्रहाचा असा उपयोग झाला, तर त्याच्या प्रसिद्धीकरणाचें

चीज झालें असें म्हणतां येईल. गेल्या पंचवीस वर्षात हिंदी राजकारणांत ज्या घडामोडी झाल्या त्याचा या लेखात परामर्श घेण्यात आलेला आहे. येथून पुढें हिंदी राजकारणाचे एक नवे पर्व सुरू होत आहे. हें पर्व समाजवादी होईल अशी माझी अपेक्षा आहे व ती अपेक्षा या लेखसंग्रहात ठिकठिकाणी प्रकट झालेली आहे यापलीकडे समाजवादासंबंधी त्यात फारसें काहीं आढळणार नाहीं. राष्ट्रवादी युगातून समाजवादी युगात पाऊल टाकण्याच्या संधिकालात हा लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे, यात एक औचित्य आहे असें मला वाटतें

इस्लामपूर (जि सातारा),
ता २५-९-४६

—श्री. द. जावडेकर

# अनुक्रमणिका

# लोकमान्यांचें पुण्यस्मरण : : १

गेल्या एक तारखेस लोकमान्यांचे देहावसान होऊन पांच वर्षें पूर्ण झाली. तत्त्वज्ञान आणि व्यवहार, किंवा धर्म आणि राजकारण या दोहोंवर सारखेच लक्ष्य ठेवून सर्व देशाचें राजकारण आपल्या हातीं घेऊन तें आपल्या मतानें चालविणारा आणि त्याला कायमचे निराळें स्वरूप देणारा व्यवहारकुशल मुत्सद्दी, अप्रतिम बुद्धिमत्तेनें विद्वानांस थक्क करून सोडणारा अद्वितीय पंडित आणि आपल्या अपार प्रेमानें, स्वार्थत्यागानें आणि लोकसेवेनें सर्व जनतेची अंतःकरणें आकर्षून घेणारा असामान्य लोकमान्य, अशा कोटींत लोकमान्यांची गणना होत असते. हिंदुस्थानांत खरे लोकपक्षाचें राजकारण प्रथमतः लोकमान्यांनींच निर्माण केले असें म्हणण्यास हरकत नाही. त्यांच्या पूर्वीच्या पिढींतील लोकनायकांच्या कार्याचे स्वरूप राजकीय तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाचें होतें. राजकीय तत्त्वज्ञान आणि राष्ट्राचें व्यावहारिक जिवंत राजकारण यांतील खरा भेद प्रथमतः लोकमान्यांनींच जनतेच्या निदर्शनास आणिला आणि लोकपक्षाच्या राजकारणाचा खरा पाया घातला.

राज्ययंत्रांतील व्यंगें दाखवून देणें, राज्यघटनांचे मसुदे तयार करणें, लोकांच्या गाऱ्हाण्यांची यादी तयार करणें किंवा ती राज्यकर्त्यांपुढें मांडणे, एवढ्यानें व्यावहारिक राजकारण संपत नाहीं; हें केवळ राजकीय तत्त्ववेत्त्यांसहि करतां येण्यासारखें आहे. परंतु लोकांत देशकालास अनुरूप अशा राजकीय आकांक्षा उत्पन्न करून त्यांच्या पूर्ततेस लागणारी राष्ट्रशक्ति निर्माण करणें व वृद्धिंगत करणें आणि त्या शक्तीची प्रतिपक्षाविरुद्ध युक्तीनें योजना करणें, हें व्यावहारिक राजकारण होय. हें राजकारण चालविणाऱ्या मुत्सद्द्यांस राजकीय तत्त्वज्ञानाचा अत्यंत उपयोग आहे हें खरे असलें,

तरी यापेक्षाहि राष्ट्रशक्तीच्या संवर्धनाची व तिच्या योजनेंतील कौशल्याची त्याला अधिक जरुरी असते. लोकमान्यांच्या पूर्वीचे राजकारण बहुतांशी तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाचें असल्यामुळे सरकारकडे अर्ज-विनंत्या करण्याच्या पलीकडे तें फारसे किंबहुना मुळीच गेलेलें नव्हतें. तथापि त्या पिढीतील लोकांतहि रानड्यांच्यासारखे जे दूरदर्शी मुत्सद्दी होते, त्यांची दृष्टि याच्या पलीकडे गेलेली असून सरकारकडे अर्ज-विनंत्या करीत असतांना आपण अप्रत्यक्ष रीतीनें लोकमताची एक शक्ति जागृत करीत आहोत आणि अर्ज-विनंत्याना मिळणाऱ्या सरकारी उत्तरापेक्षा या लोकमताच्या जागृतीचे महत्त्व अधिक आहे, असे ते जाणत असत राष्ट्रशक्तीच्या अर्भकावस्थेंत किंवा गर्भावस्थेत या अर्ज-विनंत्याच्या राजनिष्ठ मार्गाचें आवरण तिला अवश्य असलें, तरी या दरबारी पोषाखांत त्या शक्तीचे सामर्थ्य विशिष्ट मर्यादेपलीकडे वाढणे शक्य नव्हतें. कारण हे कवच गुलामगिरीचे द्योतक होतें ही गोष्ट लोकमान्यांनीं प्रथमतः ओळखली आणि राष्ट्रशक्तीच्या विकासाला विरोध करणारें कवच फोडून टाकण्याचें कार्यच त्यानी प्रामुख्याने केले. या दृष्टीनें विचार केल्यास रानड्याचेच कार्य त्यानी निराळ्या साधनानी पुढे चालू ठेविलें असें दिसून येईल. परंतु स्थूल दृष्टीच्या लोकांना तसे भासले नाही हिंदी राजकारणाचा दरबारी पोषाख उतरून त्याला लोकमान्यानी वकिली पेशा दिला व रानड्याचे स्थूलदृष्टि-भक्त त्याच दरबारी पोषाखाला कवटाळून बसून वर्धिष्णु राष्ट्रशक्तीपासून दूर झाले साध्य काय व साधन कोणतें यासंबधी घोटाळा झाल्यामुळें असे प्रमाद सामान्य मनुष्याकडून होणें अगदी साहजिक आहे रानडे, दादाभाई किंवा टिळक यासारख्या थोर व्यक्तीच्या हातून असे प्रमाद होत नाहीत याचे कारण राजकारणाचें अंतरंग कोणतें व बाह्य पेशा कोणता यातील भेद त्याना समजतो लोकमान्यांनी हिंदी राजकारणाला दिलेला वकिली पेशा किंवा त्यांनीं घातलेली कायद्याची मर्यादा हीहि त्रिकालाबाधित नाही, हें ते जाणत होते राष्ट्रीय शक्ति वृद्धिंगत करणें आणि तिची युक्तीनें योजना करणे हेंच त्यांच्या राजकारणाचे अंतरंग होतें व तें " शक्तीनें मिळती राज्यें। युक्तीनें कार्य होतसे।" या श्रीसमर्थांच्या सिद्धान्तावर उभारलेलें होतें.

लोकपक्षाच्या पुढाऱ्यानें सरकारशी जो सामना करावयाचा असतो, तो लोकमताच्या पाठिंब्यावर आणि राष्ट्रशक्तीच्या बलावरच करावयाचा असतो. अर्थात् ज्या व्यक्तीकडून किंवा पक्षाकडून राष्ट्रशक्तीचे संवर्धन होत असेल, त्या त्या व्यक्तीच्या किंवा पक्षाच्या प्रयत्नांचा ते आपल्या राजकारणांत सरकारच्या विरुद्ध उपयोग

करीत असत, आणि ज्या व्यक्तीच्या कृत्यामुळें किंवा उक्तीमुळें राष्ट्राचा तेजोभंग होत असे, त्यांची त्यांची ते कानउघाडणी करीत असत ते केवळ ध्येयवादी नसले, तरी ध्येयवादी व्यक्तीचें महत्त्व ते जाणत असत "**देशांतील लोकांपुढे अंतिमांतला अंतिम हेतु मांडून त्यांच्या मनोवृत्तीस एक प्रकारचें उदात्त वळण देणें हें केवळ श्लाध्य नव्हे, तर राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनें आवश्यकहि आहे** " हे रहस्य जाणून अशा ध्येयवादी लोकाना उघड विरोध करून राष्ट्रशक्तीचे सामर्थ्य दुभगण्याचें किंवा तें खची करण्याचे कार्य ते कधीच करीत नसत उलट, अशा ध्येयवादी लोकानी निर्माण केलेल्या नैतिक बलाचा आपल्या राजकारणास उपयोग करून घेण्यास ते नेहमी उत्पर असत. केवळ व्यवहारदक्ष आणि वाक्पडित अशा शेकडो नेमस्त पुढाऱ्यापेक्षा अरविंदबाबूसारख्या एकदोन व्यक्तीचेच राष्ट्रबल-संवर्धनाच्या दृष्टीने अधिक महत्त्व आहे, अशी जर त्यांची खात्री नसती, तर सुरतेच्या राष्ट्रीय सभेंत त्यानी नेमस्त पक्षाशी जो धैर्यानें सामना दिला तो खास दिला नसता

ध्येयवादाची उत्पत्ति मनुष्याच्या तत्त्वनिष्ठेंतून किंवा धर्मबुद्धीतून होत असते अर्थात् याच्याइतकी उच्च मनोवृत्ति मनुष्यसमाजांत दुसरी कोणतीहि सांपडणें शक्य नाही या धर्मबुद्धीचा विकास व्हावा, धर्मनिष्ठांचा प्रतिपाल व्हावा आणि उच्च तत्त्वरूपी मानवी ध्येयांचा अवतार पृथ्वीतलावर व्हावा, याकरितांच राजकारणाचाहि अवतार झालेला आहे, अशी त्याची कल्पना होती. त्याच्या राजकारणाचा उगम धर्मबुद्धीतून झालेला आहे, राजकारण हा धर्म आहे, किंवा धर्माचे एक अंग आहे, हे सिद्ध करण्यासाठीच त्यांनी 'गीतारहस्य' हा ग्रंथ लिहिला असें म्हटलें तरी फारशी अतिशयोक्ति होणार नाही. अर्थात् लोकांतील धर्मबुद्धि किंवा तत्त्वनिष्ठा ही राजकारणाचीहि एक प्रेरक शक्ति असते किंवा होऊं शकते, हें त्यांना पूर्णपणें माहीत होतें. सध्या आपल्या धर्मात पुष्कळ हीन तत्त्वें शिरली आहेत व तीं घालवून देऊन धर्माचें शुद्धीकरण झाले पाहिजे हें त्यांना मान्य होतें. परंतु समाजाचे धारण करणारी धर्मबुद्धीच मारून टाकावी किंवा ती एका विशिष्ट व्यवहारातच कोंडून ठेवावी हा जडवाद त्यांना मान्य नव्हता. उलट, समाजांतील सर्व व्यवहारावर या धर्मबुद्धीची छाया पडावी व प्राचीन काळा-प्रमाणे आपल्या सर्व समाजाचें अधिष्ठान धर्मावर न्यावें हेंच त्यांना इष्ट होतें. अशी स्थिति प्राप्त होणे म्हणजे राजकारण, व्यापार किंवा आर्थिक व्यवहार यांतहि

उच्च ध्येयांचा उदय होणे हे अवश्यच असतें. मनुष्यांच्या स्वार्थी पाशवी वृत्ति दाबांत ठेवणारी धर्मबुद्धि समाजांत जागृत झाल्याखेरीज देशाच्या राजकारणा-करितां आपल्या स्वार्थाची होळी करण्यास लोक तयार होणें शक्य नाहीं तसेंच राजकीय संस्थांच्या अस्तित्वाखेरीज किंवा सुस्थितीखेरीज धर्माचेंहि संरक्षण होणें शक्य नाहीं, हा धर्म आणि राजकारण यांतील अत्यंत निकट संबंध समजून त्या-वरच त्यांचें धोरण आंखलेलें दिसून येतें

राष्ट्रसंवर्धनाच्या कार्याची राष्ट्रीय भावना व राष्ट्रीयसंघटना अशीं दोन अंगे असतात. लोकमान्यांच्या आयुष्यातील बहुतेक भाग राष्ट्रीय भावना जागृत करून ती प्रभावशाली करण्यांतच खर्च झालेला आहे आणि म्हणूनच नेमस्त पक्षाकडून त्यांच्या कार्यावर " विध्वसक कार्य " असा शेरा मारला जात असे. परंतु राष्ट्रीय संघटनेचे कार्य राष्ट्रीय ध्येयांना अनुसरून व राष्ट्रीय प्रयत्नानीं होईल तरच तें परिणामीं हितावह होईल, अशी त्यांची खात्री असल्यामुळे परकीय ध्येयांनीं प्रेरित होऊन परकीय राज्यकर्त्यांच्या मदतीनें चालविलेल्या संघटनेच्या प्रयत्नांवर त्यांना टीका करावी लागत असे. जोंपर्यंत राष्ट्रांत राष्ट्रीय भावनाच उदित झालेली नव्हती, तोंपर्यंत राष्ट्रीय संघटना होणें अशक्यच होतें. तथापि लोकमान्यांचा राष्ट्रीय संघटनेचा कार्यक्रम स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या रूपानें १९०५–०६ सालापासून जनतेपुढें आहे आणि त्या रूपानें व्यापक प्रयत्न करून लोकमान्यांनी जागृत केलेली राष्ट्रीय भावना चिरंतन करणें, हें त्यांच्या अनुयायांचें आद्य कर्तव्य आहे

तथापि व्यक्त स्वरूपाची राष्ट्रसंघटना फार मोठ्या प्रमाणावर परतंत्र राष्ट्रांत होऊं शकत नाहीं, हें जाणून लोकमान्यांचे सर्व प्रयत्न स्वराज्याच्या एका प्रश्नावरच केंद्रीभूत झालेले होते. या कार्याकरितां राष्ट्रीय सभा संघटित व सामर्थ्यवती बनवावी, याबद्दल त्यांचे सर्व प्रयत्न चालू असत. राष्ट्रीय सभा ही केवळ विचार-विनिमयाची संस्था न राहतां तिनें स्वराज्याच्या दृष्टीनें देशाची राजकीय संघटना करावी आणि तिच्या पाठिंब्यावर सरकारशीं स्वराज्याचा लढा खेळणारा एक लोकशाहीचा पक्ष देशांत अस्तित्वांत यावा व त्यानें आपल्या देशास शक्य तितक्या लवकर राजकीय दास्यांतून मुक्त करावें, याबद्दल त्यांचे अखेरचे प्रयत्न चालू होते. राष्ट्रीय सभेंत साम्राज्यांतर्गत स्वराज्यवादी व निर्भेळ स्वराज्यवादी या दोघांचाहि समावेश व्हावा, परंतु सर्वांनीं बहुमताचे निर्णय मान्य करावेत व राष्ट्रीय सभेच्या नांवानें कार्य करावें असें त्यांचें म्हणणें होतें.

लोकमान्यांनी चाळीस वर्षे देशाकरितां खपून आणि तुरुंगवासासारख्या हाल-अपेष्टा सोसून खऱ्या कर्मयोगाचें आचरण केलें, भगवद्‌गीतारहस्यासारखा अप्रतिम ग्रंथ लिहून स्वधर्माचें खरें ओजस्वी स्वरूप जनतेला पटवून दिलें, इतरहि इंग्रजी ग्रथ लिहून आपल्या सस्कृतीचें प्राचीनत्व आणि श्रेष्ठत्व जगाला पटवून दिलें, हिंदी राजकारणाला लोकशाहीचें वळण लाविलें, लोकांत स्वाभिमान जागृत करून राष्ट्रीयत्वाचा परिपोष केला आणि लोकपक्षातर्फे नोकरशाहीशी सतत सामना चालू ठेविला. हा चाळीस वर्षे सामना करूनहि त्याना आपले उद्दिष्ट प्राप्त करतां आलें नाही; महायुद्धानतर दिलेल्या सुधारणाहि समाधानकारक मिळाल्या नाहीत, तथापि अंतकाळपर्यंत त्यांचा उत्साह व कार्यनिष्ठा ही कायम होती आणि " जें हातांत पडलें आहे तें समाधानकारक नसून निराशाजनक असल्यामुळें पार्लमेन्ट सभेकडून पूर्ण स्वराज्याचे हक्क मिळेपर्यंत चळवळ करा " असाच संदेश जनतेला देऊन ते परलोकास गेले त्यास भान ठेऊन ही चळवळ शेवटास नेण्याची जबाबदारी हल्लीच्या पिढीवर आहे. लोकमान्यांनीं आपल्या पूर्वजाचें व मातृभूमीचें ऋण तर फेडलेंच, पण पुढील पिढ्यांसहि त्यांनीं ऋणी करून ठेविले आहे. त्यांतून निदान उतराई तरी होणे हें प्रत्येकाचें अवश्य कर्तव्य आहे. मात्र, त्यांच्या राजकारणाच्या किंवा इतर देशसेवेच्या बाह्य पेशालाच कवटाळून न बसता त्यांतील अतरंग जाणून घेऊन आपले अतरग राष्ट्रीय अंतरंगांत किवा आपला आत्मा राष्ट्रात्म्यांत मिसळून आपण लोकसेवेस पुढे सरसावले पाहिजे. राष्ट्रशक्तीचे पेशे नेहमीच बदलत राहणार. आज ती दरबारी पेहेरावात असली, तर उद्या ती वकिली पोषाखांत दिसूं लागेल. यानंतर ती कांही काळ शुद्ध व शुभ्र फकिरी पेशांत दिसली, तर कदाचित् काही काळानें त्याच शुभ्र फकिरी वेषावर रामदासी भगवा रग चढेल. कारण फकिरी–वृत्ति व रामदासी-वृत्ति यांचें अतरग स्वार्थत्याग, निष्कामता आणि दृढनिष्ठा इत्यादि गुणांत सारखेच असतें. तें कांही झालें, तरी आपणांला वेषाची सेवा करावयाची नसून राष्ट्रशक्तीची सेवा करावयाची आहे हें जो जाणील, त्यालाच लोकमान्याचें खरे हृद्गत समजणार आहे तें ओळखून प्रत्येकानें त्यांच्या ऋणातून मुक्त व्हावें अशी विनंति करून हें प्रेमळ कार्य संपवितों.

टिळक महाविद्यालय त्रैमासिक
ऑगस्ट, १९२६

# असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा : : २

" अलोकसामान्यमचिंत्यहेतुकम् ।
द्विषन्ति मंदाश्चरितं महात्मनाम् ॥ "

—कालिदास

दिवंगत लोकोत्तर विभूतींचें निरनिराळ्या प्रसंगानें स्मरण करून त्यांचें गुण-गौरव करावें व त्या गुणांचा आविर्भाव आपल्या व आपल्या देशबांधवांच्या अंगीं होण्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना करावी हा प्रघात सर्व जगांत रूढ आहे त्याच-प्रमाणें तो आपल्या देशांतहि रूढ असून दरसाल ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या तारखेस लोकमान्यांचे पुण्यस्मरण करावें आणि त्या निमित्तानें देशांत चालू अस-णाऱ्या स्वराज्याच्या चळवळींत त्यांच्या स्फूर्तिदायक स्मृतीचा नवा जोम आणून ओतावा, असा प्रयत्न हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख शहरीं होत असतो. असे प्रसंग लोकांच्या अंत:करणांतील गंभीर व पवित्र भावना जागृत करून त्यांची कर्तव्य-परायणता वृद्धिंगत करण्याचे असतात. ज्या लोकनायकानें आजन्म भगीरथ प्रयत्न करून लोकाना आपल्या गत स्वातंत्र्याची प्राप्ति करून घेण्यास उद्युक्त केलें, ज्यानें आपल्या उज्ज्वल प्राचीन संस्कृतीचा अभिमान जागृत करून लोकांत आत्म-श्रद्धा निर्माण केली आणि आपल्या देशभक्तीच्या कार्यांत असामान्य धैर्य व अपूर्व स्वार्थत्याग प्रकट केला, त्याची पुण्यतिथि साजरी करण्यांत लोकांतील स्वातंत्र्य-लालसा, आत्मश्रद्धा, तत्त्वनिष्ठा व स्वार्थत्याग या भावना वृद्धिंगत व्हाव्यात याहून इतर कोणता हेतु असणें उचित आहे ?

महाराष्ट्रांतील ' केसरी ' संप्रदायाकडून मात्र ही औचित्य-दृष्टि योग्य प्रमाणांत पाळली जात नाही असें मोठ्या कष्टानें म्हणावे लागतें कांही मूढ मूर्तिपूजक ज्याप्रमाणे आपल्या इष्ट देवतेव्यतिरिक्त इतर सर्व देवदेवताची निंदा किंवा अवहेलना करणें यासच आपली पराभक्ति समजतात, त्याचप्रमाणें लोकमान्यांव्यतिरिक्त सर्व दिवंगत व विद्यमान लोकनायकाची अवहेलना करणे यालाच 'केसरी'कार टिळकभक्ति मानतात असे त्यांच्या अनेक लेखावरून दिसून येतें यामुळें प्रचलित राजकारणांत स्फूर्तीचा नवा जोम निर्माण करण्याचे एकीकडेच राहून आपल्या अशा लेखांनी विद्यमान लोकनायकाबद्दल ते असंतोष व अनादर मात्र उत्पन्न करतात व त्यामुळे जनतेचा बुद्धिभेद होऊन प्रचलित राजकारणाला विरोधी अशी एक शक्ति निर्माण होत असते. सुदैवानें त्यांच्या या विरोधी लेखनाचा जनतेच्या मनावर अनिष्ट परिणाम होण्याचा काळ झपाट्यानें मागे पडत चालला आहे तथापि त्यापासून ते अद्यापि घ्यावा तो बोध घेतात, असें दिसत नाही.

आम्ही म्हणतो त्याचें प्रत्यंतर ज्यास पाहावयाचें असेल त्यानें गेल्या १ ऑगस्ट रोजी 'केसरी'त आलेला अग्रलेख नीट वाचून पहावा. एका लोकमान्यांचें पुण्यस्मरण करण्याच्या निमित्तानें एकछत्री इंग्रजी अंमल येथे सुरू झाल्यापासून म० गांधीपर्यंत जे अनेक थोर पुरुष होऊन गेले त्या सर्वांचा नामनिर्देश करून प्रत्येकाची थोडीफार अवहेलना त्यांत केलेली आहे, आणि शेवटी म० गांधी व लो० टिळक यांची तुलना करतांना तर या अवहेलनेची कमालच करण्यांत आलेली आहे किंबहुना, या लेखांतील सर्वच प्रतिपादन मोठें विलक्षण आहे. याचा मथळा काय? तर **"लो० टिळक व असंतोषात्मक देशभक्तीची मीमांसा"**! परंतु असंतोषात्मक देशभक्ति ही काय चीज आहे? देशभक्ति हा मनुष्याच्या मनाचा सहज धर्म आहे, की असतोष हा देशभक्तीचा आत्मा आहे? असंतोषात्मक मातृभक्ति, पितृभक्ति किंवा अपत्यवात्सल्य असले शब्दप्रयोग कधीं कोणीं ऐकिले आहेत काय? परकीय राज्यासंबंधीच्या असंतोषामुळे लोकमान्य हे देशभक्त झाले असें ध्वनित करणे हें त्यांचें गुणगौरव आहे कीं त्यांची निंदा आहे? आमच्या मतें असंतोष हा देशभक्तीचा आत्मा किंवा अतरंग कधीच होणें शक्य नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणात स्वभावतः देशभक्ति असली, तरच त्याला परकीय अमलाबद्दल असंतोष वाटेल हें उघड आहे पण असंतोषांतून देशभक्ति निर्माण होते असें म्हणणें, किंवा असंतोष हेंच देशभक्तीचें खरे अंतरंग मानणें म्हणजे देशभक्तीच्या

मंगल व पवित्र भावनेशीं आपलें अंतःकरण अपरिचित आहे असें जाहीर करण्यासारखेंच आहे. ' केसरी 'कारांनी या सर्व लेखाची रचना सुप्रसिद्ध दिवंगत इंग्रज लेखक सर व्हॅलेंटाइन चिरोल याच्या विचारावर केलेली आहे. त्यानें लोकमान्यांना 'हिंदुस्थानांतील अस्वस्थतेचे जनक' (Father of Indian Unrest) असें जे म्हटले त्यांतील 'unrest' या शब्दाचे भाषांतर ' केसरी ' कारांनी ' असंतोष ' असेंच प्रायः केलेले आहे. एके ठिकाणी मात्र अस्वास्थ्य असा अर्थ केला आहे व तोच आमच्या मतें अधिक यथार्थ आहे इंग्रजांविषयीं नुसता असंतोष उत्पन्न होणें किंवा उत्पन्न करणे याला इंग्रज भीक घालणार नाही. या असंतोषांतून जेव्हा देशात अस्वस्थता किंवा अशांतता उत्पन्न होते, तेव्हांच इंग्रजाचें तिकडे लक्ष जातें. नुसता असंतोष परकीय वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या रोज लाथा खाणाऱ्या अनेक सरकारी नोकरांच्या अंतःकरणांत वसत असतो व मनांतल्या मनांत किंवा खासगी रीतीनें ते इंग्रजाला सहस्रशः शिव्या देत असतात. असंतोष हाच देशभक्तीचा आत्मा समजल्यास हे असंतुष्ट अधिकारी मोठे देशभक्त ठरतील ! अर्थात् लोकमान्यानी आपल्या देशभक्तीच्या व धैर्याच्या जोरावर देशांत अस्वस्थता उत्पन्न केली, असें म्हणणाऱ्या चिरोलनेंच लोकमान्यांचें कार्य अधिक ओळखिलें होतें, असे म्हणावें लागतें ही अस्वस्थता उत्पन्न करण्यास देशभक्तीचा व धडाडीचा जोर लागतो. नुसता पोकळ असंतोष निर्माण झाला काय किंवा न झाला काय, दोहोंची किंमत सारखीच. आजकालच्या 'केसरी'नें मात्र आपल्या कार्याची मर्यादा असंतोष एवढीच आंखून घेतलेली आहे ! परंतु सध्यां तरी या कार्याची देशाला मुळींच गरज उरलेली नाही. सरकारच्या दुष्कृत्यांवर कायद्याच्या कक्षेंत राहून कितीहि टीका केली, तरी तेवढ्यानें लोकांचे हक्क किंवा स्वराज्य त्यांना मिळेल असें आज कोणासहि वाटत नाहीं.

' केसरी ' कारांनी देशभक्तीचा आत्मा जसा असंतोष हा ठरविला आहे, त्याचप्रमाणें त्यांची टिळकभक्तिहि आज केवळ असंतोषात्मकच उरलेली आहे. इंग्रजांना शिव्याशाप देणें याला जसे ते श्रेष्ठप्रतीची देशभक्ति समजतात, त्याचप्रमाणें म० गांधीची अवहेलना किंवा हेटाळणी करणें यालाच ते टिळकभक्ति असें मानतातसें दिसतें. या असंतोषात्मक टिळकभक्तीमुळे महाराष्ट्राचें गेल्या दहा वर्षांत फार मोठें नुकसान झालें आहे. म. गांधींच्या कार्यासंबंधीं लोकांत असंतोष पसरविणें यालाच सध्यांचा ' केसरी ' टिळकभक्ति मानीत असल्यामुळें, अशी ही असंतोषात्मक टिळकभक्ति

महाराष्ट्रांतून नाहीशी होईल तो सुदिन, असें कित्येकांस वाटू लागलें असल्यास त्यांत नवल नाही. कारण आज म गांधीच्या कार्याबद्दल व राजकारणाबद्दल ज्यांना ज्यांना म्हणून कोणत्याहि कारणामुळें असंतोष वाटत आहे, ते ते सर्व आपणांस टिळकभक्त समजूं लागले आहेत ! ज्यांना खादी वापरावयाची नसेल, ज्यास अस्पृश्यता-निवारण पसंत नसेल, हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचे प्रयत्न ज्यांना आवडत नसतील, किंवा कायदेभंग अगर करबंदीसारख्या चळवळीत ज्यांना भाग घ्यावयाचा नसेल, ते सर्व लोक अशा गोष्टीना टिळकभक्तीच्या नावाखाली विरोध करू शकतात; व असे असंतुष्ट टिळकभक्त सध्या तरी महाराष्ट्रांत बरेच आहेत असल्या असंतुष्ट टिळकभक्तांत 'भाला'कार हे अग्रगण्य होत. 'केसरी'नें प्रस्तुत लेख लिहून त्यांच्याच पक्तीस बसण्याचा मान मिळविला आहे इतकेच नव्हे, तर 'केसरी'कारांनी आपलें खरे स्वरूपाविष्करण केल्याबद्दल 'भाला'कारांनी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदनहि केलें आहे

तथापि, या असंतुष्ट टिळकभक्ताचे स्वतःचे असें कोणतेंहि राजकारण नाहीं. तुम्ही स्वत.चा एकादा कार्यक्रम देशापुढें कां ठेवीत नाही असें त्यांस विचारल्यास ते एकदम वेदान्तात शिरून उत्तर देतील कीं, "सृष्टि ही त्रिगुणात्मक आहे. सत्त्व, रज आणि तम या गुणांचे मिश्रण निरनिराळ्या व्यक्तीत निरनिराळ्या प्रमाणांत झालेलें असतें. अर्थात् ज्यानें त्यानें आपणांस जे सुचेल व पचेल तें करीत रहावें आम्ही कोणास प्रोत्साहनहि देणार नाही व कोणाचा निषेधहि करणार नाही." हा आपला त्रिगुणात्मक सृष्टीचा सिद्धान्त दिक्कालद्यनवच्छिन्न असल्यामुळें कोणीहि, केव्हांहि व कांहीहि करून यश मिळविलें तरी त्याचे श्रेय ते आपल्याच तत्त्वांना देऊं शकतात हें उघड आहे. त्यांचें ध्येय 'स्वराज्य' या मोघम शब्दाने व्यक्त होतें या शब्दाचा अर्थ 'निर्भेळ स्वराज्य,' 'साम्राज्यांतर्गत स्वराज्य,' 'प्रांतिक स्वराज्य' किंवा 'स्थानिक स्वराज्य' यांपैकीं कोणताहि होऊं शकेल, असें ते न्याय व मीमांसा या शास्त्रांच्या आधारें केव्हांहि सिद्ध करून देतील. त्यांना तुम्हीं आपलें ध्येय कोणत्या साधनांनीं प्राप्त करून घेणार असा प्रश्न केल्यास "साधनानां अनेकता" ही टिळकस्मृति ते तुमच्या तोंडावर फेकून देतील ! कायदेभंगासारख्या कोणत्याहि चढाईच्या कार्यक्रमाला हे व्यवहारनिपुण लोक 'अव्यवहार्य' कोटींत ढकलतील व आपले राजकारण नेहमींच बचावाचें ठेवतील; पण अत्याचारी मार्गाचा कोणीं निषेध केला, कीं तो सरकारचा मित्र आहे

व परंपरेनें देशाचा शत्रु आहे असें ते ध्वनित करतील "शठे शाठ्यम्" ही यांची नीति असून सर्व जगाला शठ मानल्याखेरीज कोणासहि राजकारण करतां येईल असें याना वाटत नाही देशांतील प्रातिनिधिक संस्थांतील पोकळ विरोध परिणामकारक होत नाही म्हणून त्यावर बहिष्कार घालून सामान्य जनतेची संघटना करणाऱ्या आणि तिला कायदेभंगाच्या व करबंदीच्या युद्धास प्रवृत्त करणाऱ्या कर्मवीरास हे कर्मसंन्यासी ठरवितील, आणि परकीय सरकारची लठ्ठ पगारी नोकरी करणाऱ्यांचे निष्काम कर्मयोगी म्हणून हे अभिनंदन करतील!

लोकमान्य टिळकांनी राष्ट्रकार्याचा रथ जेथपर्यंत आणून सोडिला होता, त्याच्यापुढें तो नेण्याचे कार्य म गांधी करीत आहेत, हें उघड सत्य या असंतुष्ट टिळकभक्तांना कधींहि प्रांजलपणें कबूल करावेंसे वाटत नाहीं दोन भिन्न काळांत व भिन्न परिस्थितीत आपापले कार्य करून कृतार्थ होणाऱ्या या दोन विभूतींची पक्षपाती चिकित्सक बुद्धीनें वारंवार तुलना करून लो. टिळक हेच म. गांधींच्यापेक्षां राजकारण व बुद्धिमत्ता या दोन्ही दृष्टींनी श्रेष्ठ होते, असें सिद्ध करण्याचा अयशस्वी व हास्यास्पद प्रयत्न हे असंतुष्ट टिळकभक्त सदैव करीत असतात. ता. १ ऑगस्टच्या प्रस्तुत अग्रलेखांतहि त्यांनी सर व्हेलेंटाईन चिरोल यांचा अशाच अर्थाचा उतारा देऊन त्यावर मार्मिकत्वाचा शेरा मारला आहे तो उतारा असा:—
"हल्लींच्या काळीं टिळकाइतका लोकोत्तर पुरुष कोणीच झाला नाही. कदाचित् गांधी हे त्यांच्या बरोबरीला येतील. गांधीचा सौम्यपणा व विनय टिळकांच्या अंगीं नव्हता. पण बुद्धिमत्ता व राजकारणांतील मार्मिकपणा हा गुण गांधीपेक्षां टिळकाच्या अंगी फार अधिक प्रमाणानें होता"

परंतु राजकारणांतील मार्मिकपणा जर गांधींच्या अंगीं टिळकांपेक्षां कमी आहे, तर ते मोठमोठ्या चळवळी यशस्वी करून कसे दाखवितात याची कांही तरी मीमांसा या असंतुष्ट टिळकभक्तांना करावीच लागते प्रभातकालीन सूर्यप्रकाशापेक्षां मध्यान्हीचा सूर्यप्रकाश अधिक प्रखर नसतो असें म्हणणें अशक्य असल्यामुळें निदान तो तसा भासतो असें तरी मान्य केल्याशिवाय कोणासहि गत्यंतर नसतें; त्याचप्रमाणें या असंतुष्ट टिळकभक्तांची या बाबतीत स्थिति होते. याच लेखांत 'केसरी'कार लिहितात, "निव्वळ चळवळीच्या दृष्टीनें पाहिलें असतां लो० टिळकांपेक्षां म० गांधीनीं केलेली चळवळ अधिक व्यापक व अधिक परिणामकारक भासते" टिळकांचा मोठेपणा सिद्ध करण्यासाठी ज्यांनीं चिरोलच्या शब्दप्रामाण्याचा आधार

दिला, त्यांनी अगदी अज्ञानी जनतेच्याहि उघड प्रत्ययास येणाऱ्या या गांधींच्या मोठेपणाला मान्यता देण्यांत इतके आढेवेढे कां घ्यावेत? किंवा हा मोठेपणा केवळ भासमान होणारा किंवा आभासात्मक आहे असें ध्वनित कां करावें? लोकांना गांधीच्या चळवळीच्या अधिक व्यापकत्वाचा व अधिक परिणामकारित्वाचा जो हा भास होत आहे त्याची मीमांसा करताना तर या असंतुष्ट टिळकभक्तांची निःपक्षपातबुद्धि अगदीच विलयाला जाऊन लोकांना असा भास होण्याचे कारण म० गांधीची 'बुवागिरी' आहे असा कोटिक्रम यानीं लढविला आहे!

तथापि म० गांधीच्या लोकोत्तर साधुत्वाला 'बुवागिरी' हें उपहासात्मक व निंदागर्भ नांव देण्यानें लोकांत कोणाचा उपहास व कोणाची निंदा होईल, याचा विचार या असंतुष्ट टिळकभक्तानी करावयास हवा होता म. गांधीना आज हिंदी राजकारणांत जो अद्वितीयत्वाचा मान मिळत आहे, तो केवळ त्यांच्या बुवागिरीमुळें मिळत आहे असें मानणें म्हणजे बुवांच्या पाठीमागें लागणाऱ्या साध्याभोळ्या बायाबापड्यांच्या बुद्धीत आणि हिंदी राष्ट्रीय सभेतील व इतर सर्व पक्षांतील कर्त्या पुढाऱ्याच्या बुद्धिमत्तेत मुळीच फरक नाही व राजकारणांतील मार्मिक बुद्धिमत्तेचा सर्व संचय पुण्यांतील असंतुष्ट टिळकभक्तांच्या डोक्यांतच झालेला आहे असें मानण्यासारखेंच आहे म० गांधीच्या पुतळ्यावर कोरून ठेवण्यास योग्य असें जें त्यांनी ब्रीदवाक्य म्हणून शोधून काढिले आहे, तेंहि त्यांच्या मार्मिक राजकारणी बुद्धीचें व नि.पक्षपातीपणाचें तितकेंच द्योतक आहे केवळ "अनत्याचारी रहा व खादी वापरा" एवढाच निरुपद्रवी उपदेश गेली दहापंधरा वर्षें म गांधी हिंदी जनतेला करीत आहेत असेंच 'केसरी' कार महाराष्ट्रीय जनतेला वारंवार सांगत असल्यामुळें तेंच त्यांचें ब्रीदवाक्य म्हणून त्यांनी लोकांपुढें मांडावें हें साहजिकच आहे आणि म. गांधींचें एवढेंच ब्रीदवाक्य आहे असें एकदां गृहीत धरल्यावर महात्माजींनीं सरकारावर केलेली टीका "म्हणजे घरच्या लाडक्या मुलानें वडील माणसांच्या तोंडांत मारणें किंवा मिशा उपटणें यासारखें" सरकारला संतोषकारक वाटतें, ही केसरीकाराची कल्पनाहि मान्य करण्याला हरकत नाही. पण "अनत्याचारी रहा व खादी वापरा" एवढाच निरुपद्रवी उपदेश करीत हिंडणाऱ्या बुवाला येरवड्याच्या तुरुंगांत डांबून ठेवून तेथेंहि त्याची बुवागिरी चालू ठेवण्याचा उपद्व्याप करण्याची सरकारला काय गरज होती, याचा उलगडा या उपपत्तीनें होऊं शकत नाहीं. कारण मग हाच उपदेश करणाऱ्या व पाळणाऱ्या हजारों बुवाभक्तांना तुरुंगांत डांबून ठेवणें,

किंवा लाठीनें त्यांचीं डोकी सडकणें हें सरकारचें कृत्य वेडेपणाचे ठरत नाहीं काय? परंतु सरकार इतकें वेडे असेल असें आम्हांस वाटत नाही निदान चिरोल साहेबांचे शब्दप्रमाण्य मानणाऱ्या 'केसरी'कारांना तरी असें म्हणतां येणार नाही. केवळ "अनत्याचारी रहा व खादी वापरा" एवढाच उपदेश करून म गांधी किंवा त्यांचे अनुयायी थांबले असते, तर सरकारनें त्यांना कोणताहि त्रास दिला नसता. पण सरकार जें त्यांना भितें तें त्यांच्या अनत्याचारित्वाला भीत नसून त्यांच्या सत्याग्रहाला भितें सत्याग्रह व केवळ अनत्याचार यात फार फरक आहे. सत्याग्रही हा अनत्याचारी असतो, तथापि सर्वच अनत्याचारी सत्याग्रही असतात याचें उदाहरण 'केसरी' काराना दूर शोधावें लागणार नाही सत्याग्रह व अनत्याचार यांतील हा भेद ज्याना समजूं शकत नाहीं किंवा समजला तरी तो लोकांपुढें जे मांडूं इच्छित नाहीत त्यांना म गांधीचे खरे मोठेपण कसें कळणार? व तें लोकांना तरी ते कसें समजावून देणार? "जगातील सर्व अन्याय, विषमता व पारतंत्र्य याचा सत्याग्रहानें नाश करा व सर्वत्र शांततामय सत्ययुगाची प्रस्थापना करा" असा म० गांधींचा जगाला संदेश आहे, आणि तो "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" या टिळकांच्या ब्रीदवाक्यापेक्षां कमी स्फूर्तिदायक आहे असें आम्हांस वाटत नाहीं. "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" या लोकमान्यांच्या ब्रीदवाक्यापासून इतर देशांतील लोकांना विशेष बोध घेण्यासारखें कांही नव्हतें; पण सत्याग्रहाच्या अभिनव मार्गाची जरुरी आज सर्व जगाला भासूं लागली आहे, यामुळेच म. गांधीचा आज सर्व जगभर गौरव होत आहे. ते इंग्लंडांत जाऊं लागले तर त्यांचा सत्कार करण्यासाठीं स्वागतमंडळे स्थापन होतात, त्यांना अमेरिकेंतून निमंत्रणें येतात किंवा युरोपखंडांतील लोक त्यांची चातकाप्रमाणे वाट पाहूं लागतात, याचे कारण आज त्यांच्यापाशी जगाला देण्यासारखा एक थोर संदेश आहे हें होय; बुवागिरी हें त्याचे कारण नव्हे. खजूर खाणारे, छाटी परिधान करणारे व अनत्याचाराचा उपदेश करणारे बुवा आपल्या देशांत व इतर देशांत वाटेल तितके सांपडतील. परंतु त्या सर्वांचें इंग्लंडांत गेल्यावर स्वागत होत नाही, त्यांना अमेरिकेंतून निमंत्रणें येत नाहीत किंवा युरोपांतील दौऱ्यावर त्यांस कोणी पाचारण करीत नाही. ज्याच्याजवळ असा एकादा जागतिक संदेश असतो अशा अलौकिक साधु पुरुषालाच असा मान मिळत असतो ही गोष्ट स्पष्ट आहे.

सत्याग्रह म्हणजे केवळ संन्यासमार्गी साधुत्वच नव्हे, तर तें एक अतिश्रेष्ठ

प्रकारचें राजकारण आहे. अनत्याचार हे त्याचें केवळ निषेधात्मक स्वरूप होय. सत्याग्रह हें भावदृष्टीनें पाहतां आत्मबल आहे. या आत्मबलानें सैतानी अंतःकरणांत जितकी भीति उत्पन्न होते, तितकी ती कशानेंहि होत नाही. लोकमान्य टिळकांनी जनतेंत जे अस्वास्थ्य निर्माण केले होतें, त्याला म. गांधींनीं आत्मबलाचें व्यक्त स्वरूप आणून दिलें. या आत्मबलाच्या जोरावर आज त्यांनीं ब्रिटिश साम्राज्यसत्ता हादरून सोडली आहे सत्याग्रहाच्या या शक्तीमुळेंच म गांधीच्या राजकारणाला आज तेज चढलें आहे. लोकमान्याच्या राजकारणापेक्षा हिंदी राजकारणाला आज जें अधिक व्यापक व परिणामकारक स्वरूप प्राप्त झाले आहे त्याचे सर्व श्रेय या सत्याग्रहरूप आत्मबलाला आहे "शक्तीनें मिळतीं राज्यें" या समर्थ–सिद्धान्तास अनुसरून आजचे गांधीचें राजकारण चालू आहे. ब्रिटिश मंत्रिमंडळ, व्हाईसरॉय किंवा गव्हर्नर हे जे गांधीजींशी समानतेच्या नात्यानें राजकीय वाटाघाटी करतात त्यांतील मर्म त्यांच्या बुवागिरींत नसून त्यांनीं आपल्या राजकारणामागे सत्याग्रहाच्या रूपानें अखिल राष्ट्राचें जे आत्मबल उभें केलें आहे, त्यांत तें आहे. लोकमान्य इंग्लंडांत गेले त्यावेळी त्यांच्यामागे राष्ट्राची अशी संघटित शक्ति नव्हती, म्हणून त्यांचें म्हणणे ऐकून घेण्यापलीकडे पार्लमेंटरी कमिटीनें त्याच्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. किंबहुना, सत्याग्रह मोहिमेचा पराक्रम गाजविण्यापूर्वीं महात्माजी विलायतेस गेले असते, तर त्यांचीहि तीच स्थिति झाली असती. राजनीतिशास्त्रात सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानानें एक नवीन भर घातलेली आहे हें सिद्ध करण्यास चिरोलसाहेबासारख्यांच्या शिफारसपत्राची आज गरज उरलेली नाही. या दृष्टीनें पाहिल्यास लो० टिळकांच्याच नव्हे, तर जगांतील कोणत्याहि व्यक्तीच्या राजकारणाहून म० गांधीचें राजकारण श्रेष्ठ आहे, असेंच इतिहासाला लिहावें लागेल. सर्व जगाच्या राजकारणाला एक नवें वळण लावण्याचा प्रयत्न आज ते करीत आहेत.

हाच न्याय गांधींच्या बुद्धिमत्तेसहि लागू आहे लोकमान्यांची बुद्धि अत्यंत तीक्ष्ण व मीमांसक स्वरूपाची असली, तर म. गांधीची बुद्धि अधिक प्रतिभासंपन्न आहे. लोकमान्य हे भाष्यकारांसारखे महापंडित असले, तर महात्माजी हे तत्त्वद्रष्टे आहेत. नवीन सत्यें आकलन करून ती लोकांना पटवून देण्याच्या कामीं त्यांची संपन्न प्रतिभा त्यांना उपयोगी पडते शास्त्राध्ययनानें प्राप्त होणारें पांडित्य त्यांच्यापाशीं फार थोडें आहे, पण अंतःप्रेरणेच्या जोरावर मानवोन्नतीचे नवे मार्ग शोधून

काढण्यांत त्याचें बुद्धिवैभव व्यक्त होतें यामुळें त्याची प्रज्ञा अत्यंत शुद्ध व स्वतंत्र आहे. या स्वतंत्र प्रज्ञेमुळेंच त्याना सत्याग्रहाच्या अभिनव मार्गाचें आकलन करता आले. अपूर्ण जगांत साधुपुरुषानें आपली सिद्धावस्था ढळू न देतां आपलें वर्तन कसें ठेवावें याची मीमासा लोकमान्यांनी आपल्या 'गीतारहस्यां'त केली, पण या अपूर्ण जगाला पूर्णत्वाकडे नेण्याचा एक अभिनव मार्ग महात्माजीनी दाखवून दिला, हें त्याच्या स्वतंत्र प्रज्ञेचें द्योतक नाही असे कोण म्हणेल? लोकमान्यांनीं लोकाच्या बुद्धीवर बसलेल्या जुन्या भाष्यकाराचे दडपण उडवून दिले, पण प्रत्यक्ष भगवद्गीतेंतील सिद्धान्तहि सहानुभूतीच्या निकषावर घासून पाहून त्यासबंधीचा आपला निर्णय महात्माजीनी जगापुढे माडला. या बाबतीतहि त्यांचे स्वतंत्रप्रज्ञत्व अधिक व्यक्त होतें. जगांतील युद्धे अजिबात बंद झाली तरीहि अनासक्तीच्या स्वरूपांत गीतेचा संदेश जगाला कसा मार्गदर्शक होऊ शकेल हे दाखवून देऊन, जगांतील हिंसात्मक युद्धे नष्ट करण्याचा प्रयत्न करणें गीतेंतील उपदेशाला विरुद्ध नसून उलट त्याला पोषकच कसें आहे, हे महात्माजीनी सिद्ध केले आहे. सर्व धर्माचे अतिम ध्येय सत्य व अहिंसा हेंच कसें आहे आणि त्यामुळें सत्याग्रहाचा मार्ग जगाच्या ऐहिक मोक्षास कसा साधनीभूत होणार आहे, हे आपल्या स्वतत्र प्रज्ञेनें त्यांनी वारंवार सिद्ध केले आहे. आपल्या प्राचीन संस्कृतीची महती लोकमान्यांनी जगाच्या निदर्शनास आणून दिली, तर त्या प्राचीन संस्कृतीच्या प्रासादावर आणखी एक नवा मजला रचून जगांतील मानवसंस्कृतीत एक नवीन भर घालण्याचा महात्माजी मान मिळवीत आहेत

म गांधी हे इंग्रजांना आपले शत्रु न म्हणता मित्र म्हणतात, हाहि देशभक्तीच्या दृष्टीने 'केसरी' कारांनी म. गांधीचा एक कमीपणाच दाखविला आहे. परंतु यात देखील 'केसरी' कारांनी लोकमान्याच्या निष्काम कर्मयोगाच्या ध्येयाचे पूर्ण अज्ञान प्रकट केले आहे. शत्रूवरहि प्रेम करणें व त्याच्याशी नेहमी निर्वैर वृत्तीनें वागणें हेच लोकमान्यांनी कर्मयोगाचे परमश्रेष्ठ ध्येय सांगितलें आहे लोकमान्यांनी निवृत्तीपर समाजाला निष्काम कर्मयोगाचा उपदेश करून कर्मप्रवण बनविले, तर महात्माजी आज त्याच समाजाची कर्मप्रवणता अधिक वर्धमान करून शिवाय त्याला निर्वैरत्वाचे धडे देत आहेत. निष्काम कर्मयोगाचे ध्येय लोकांपुढे ठेवून शत्रूचा द्वेष करणें हें परस्परविरोधी आहे. म. गांधींप्रमाणें इंग्रजी राज्यपद्धति सैतानी आहे असें लोकमान्यांना वाटत असले, तरी सर्व इंग्रजी लोकहि सैतान

आहेत अशी त्यांची भावना असेल असें आम्हास वाटत नाही शत्रूलाहि मित्र समजण्याच्या कामी महात्मा गांधींनी लोकमान्यांच्या पुढे प्रगति केली आहे हें आम्हाला मान्य आहे, पण त्यावरून महात्माजींची देशभक्ति कमी आहे असें सिद्ध होत नसून स्थितप्रज्ञाच्या ध्येयाकडे जाण्यात महात्माजींनी अधिक प्रगति केली आहे एवढेच सिद्ध होतें महात्माजींना राजकारणात जे अधिक यश मिळत आहे, त्याचे श्रेय या त्यांच्या स्थितप्रज्ञत्वालाच आहे हें उघड आहे. अर्थात् हा त्यांचा कमीपणा नसून मोठेपणाच होय.

त्याचप्रमाणें अत्याचारी तरुणांचा निषेध करण्यास महात्माजी जसे धांवून जातात तसे टिळक जात नसत, ह्या म्हणण्यांतहि काही अर्थ नाही. राजकीय चळवळ कायद्याच्या नि सीम टोकापर्यंत भिडविण्याचें कार्य टिळकांनी मुख्यत्वे केलें, तर जुलमी कायदे पद्धतशीर रीतीनें मोडण्याची शिकवण गांधीजी देत आहेत. महात्मा गांधी लोकांमध्यें उघड बडखोर वृत्ति जितकी निर्माण करतात, तितकी लोकमान्य करीत नसत. सरकारनें अमुक अमुक केले नाही, तर लोकांत बंडाची प्रवृत्ति वाढत जाईल एवढेच बजावून टिळक थांबत; पण गांधींना लोकांतील या बंडाच्या प्रवृत्तीला विशिष्ट वळण लावून निःशस्त्र क्रांति घडवून आणावयाची आहे. टिळक निःशस्त्र किंवा सशस्त्र कोणत्याहि प्रकारची क्रांति प्रत्यक्ष संघटित करीत नव्हते ते सरकारला क्रांतीची केवळ दहशत घालीत असत, तर गांधी उघडपणें नि शस्त्र क्रांतीची संघटना स्वतः करून सरकारला नमवीत आहेत गांधी हे जसे मुत्सद्दी आहेत, तसेच सेनापतीहि आहेत अर्थात् त्यांचा क्रांतीचा एक विशिष्ट मार्ग ठरलेला असल्यामुळें देशातील तरुणांची प्रवृत्ति सशस्त्र क्रांतीकडे न होतां त्या सर्वांनीं आपल्या प्राणाच्या आहुती एका विशिष्ट प्रकारेच द्याव्यात अशी त्यांची इच्छा आहे आपल्या राष्ट्राचे व मानव-समाजाचें कल्याण ज्यांत आहे असा क्रांतीचा एक अभिनव मार्ग त्यांनी शोधून काढल्यामुळे व ती क्रांति यशस्वी करून दाखविण्याचे कार्य त्यांनीं हातीं घेतलें असल्यामुळें, त्यांना शिस्तीच्या दृष्टीनेंहि अत्याचाराचा निषेध करणें अवश्य आहे. जर सशस्त्र क्रांतीचा मार्ग राष्ट्राला हितावह आहे असें त्यांना वाटले असतें, तर त्यांनी तीच संघटना स्वतः हातीं घेतली असती व तरुणांना योग्य तो मार्ग दाखविला असता; नुसता निषेध करून ते कधींहि स्वस्थ बसले नसते. देशांतील सर्व तरुणांच्या जीवनाची जबाबदारी जबाबदार पुढाऱ्यांवर असते; व त्यांचें कोठें चुकत असेल, तर लोकांची अप्रियता स्वीकारूनहि त्यांना चूक म्हणणें आणि त्यांच्या

उत्साहाला व स्वार्थत्यागाला अधिकांत अधिक परिणामकारक असा मार्ग दाखवून देणें हें प्रत्येक लोकनायकाचें पवित्र कर्तव्य आहे जो लोकनायक एका विशिष्ट मार्गानें आपल्या जन्मभूमीची मुक्तता करून घेण्याच्या कार्यांत व्यापृत झाला आहे, त्याला त्या मार्गाच्या विरुद्ध दिशेनें जाणाऱ्यांचा निषेध करावा लागतो, व तसा त्याला अधिकारहि आहे म० गाधी हे तरुणांच्या अतःकरणांतील क्रांतीची वृत्ति टिळकांहून अधिक प्रमाणात जागृत करतात व म्हणून तिचा योग्य मर्यादेंत संयम करण्यासहि त्यांना पुढें यावें लागतें टिळक हे स्वतः क्रातिकारक नव्हते, पण गांधी स्वतः क्रातिकारक आहेत, म्हणूनच हा भेद ठळकपणें दिसून येतो.

सारांश, कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी **म. गांधी हे लो. टिळकांच्या पुढील राष्ट्रकार्य करीत आहेत** व त्यांचे सर्व वैशिष्ठ्य या पुढील कार्यास अनुरूप असेंच आहे, हें महाराष्ट्रानें प्रांजलपणें कबूल केले पाहिजे हें कबूल करण्यांत जोंपर्यंत महाराष्ट्राला कमीपणा वाटत आहे, तोंपर्यंत त्याची प्रगति होण्याची आशा नाहीं. असें म्हणण्यांत आमच्या अंतःकरणांतील टिळकभक्तीस आम्ही कोणत्याहि प्रकारे कमीपणा आणीत आहोत असें आम्हांस वाटत नाही. हिंदी राजकारणाचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार केल्यास महर्षि दादाभाई नौरोजी, लो टिळक व म गांधी या तिघांचाहि दर्जा आम्ही सारखाच मानतों. लोकमान्यांनी जसे दादाभाईंचे कार्य पुढें चालविलें, तशी महात्माजींनी त्याच्याहि पुढील कार्याची दिशा लोकाना दाखवून दिली पण म. गांधीनी गेल्या दहा–बारा वर्षांत हिंदी राजकारणांत व लोकांच्या विचारांत जी विलक्षण क्रांति घडवून आणिली आहे व तसें करताना त्यांनी जें बुद्धिवैभव व राजकारणकौशल्य दाखविलें आहे त्याला गौणत्व देऊन आम्हीं 'आमचे टिळकच अधिक थोर होते,' असले प्रलाप वेळीअवेळी काढून लोकांचा बुद्धिभेद करणें व प्रचलित राजकारणाविषयीं असंतोष पसरविणें हीच टिळकभक्तीची व्याख्या असल्यास, तिला आमच्या मनांत मुळींच थारा नाहीं, असें म्हणण्यांत आम्हांला कोणताहि कमीपणा वाटत नाही; कारण ' केसरी 'कारांप्रमाणें आमची टिळकभक्ति असंतोषात्मक नाहीं.

लोकशिक्षण :<br>
ऑगस्ट, १९२९

# लो. टिळकांचें राष्ट्रीय तत्त्वज्ञान : : ३

"भीक मागून राजकीय हक्क मिळत नसतात; कोणतेंहि सरकार झाले तरी तें स्वार्थसाधूच असतें, एक राष्ट्र दुसऱ्यावर राज्य करतें तें आपल्या फायद्याकरितां राज्य करतें, जिंकलेल्या लोकांच्या फायद्याकरितां नव्हे;...उद्योग करावा-नेटानें करावा; होईल तितकें अडवावें; नाक धरल्याशिवाय तोंड उघडत नाही. हा स्वार्थाचा प्रश्न आहे, धर्माचा किंवा औदार्याचा नाही; राजनीति आहे, धर्मनीति नव्हे; जिंकलेल्या लोकांस जेत्यांनी आपखुषीनें स्वातंत्र्य दिल्याचें उदाहरण इतिहासांत नाही.... शहाणपण सत्तेंत आहे, दैन्यात नाही. स्वातंत्र्य हेंच प्रत्येक राष्ट्राचे अंतिम साध्य आहे...तुम्हांस काय पाहिजे आहे तें उघड सागा; त्याकरितां इतर राष्ट्रांनी प्रयत्न केले तसे उघड करा, भिऊं नका....संकटांखेरीज स्वातंत्र्य नाही, आणि रात्रीखेरीज सकाळ नाही; तुम्हांस जर मिळवावयाचें असेल तर तें तुमच्या निश्चयानें, उद्योगानें आणि धैर्यानें मिळेल; सरकार बलिष्ठ असले तर तें तुमच्या मदतीनें बलिष्ठ झालेलें आहे; तुमच्यामधील भेद हेच सरकाराचे कवच; तुमची दुर्बलता तें त्यांचे बल; तुमचें स्वतःबद्दल अज्ञान हें त्यांचें सामर्थ्य; तुम्ही ओळखाल तर सर्व तुमचेंच आहे, असें या नव्या म्हणजे राष्ट्रीय पक्षाचें धोरण व कृति असून शरीरद्वारा व द्रव्यद्वारा झीज सोसण्यास हा पक्ष तयार आहे."

—लो० टिळकांचे केसरीतील लेख। भाग ३, पृ. २५५

लो. टिळक याची सतरावी पुण्यतिथि या महिन्याच्या १ तारखेस सर्व हिंदुस्थानभर प्रतिवर्षीपेक्षां मोठ्या प्रमाणावर साजरी करण्यांत आली. त्या निमित्तानें ठिकठिकाणी लोकमान्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानासंबंधीं निरनिराळ्या वक्त्यांनीं व

लेखकांनीं आपापली मतें व्यक्त केली. यंदाच्या या लोकमान्यांच्या पुण्यतिथीचा विशेष म्हणजे हा कीं, ही पुण्यतिथि नित्याप्रमाणे राष्ट्रसभेकडून साजरी केली जात असता ज्या प्रांतांत राष्ट्रसभेची मंत्रिमंडळें अधिकारारूढ झालीं आहेत, त्या प्रांतांत या उत्सवांत तेथील मंत्र्यांनीं उघडपणे भाग घेतला. लोकमान्याच्या निधनानंतर ज्या राष्ट्रसभेनें स्वराज्यसंग्राम चालवितांना आपणांवर तीन वेळां जवळजवळ वनवास ओढवून घेतला होता, त्याच राष्ट्रसभेने अधिकारारूढ होऊन लोकमान्यांची पुण्यतिथि 'अधिकारस्वीकारदिन' म्हणून साजरी करावी, यांत एक विशेष प्रकारचें औचित्य आहे, हे कोणीहि मान्य करील. राष्ट्रसभेनें गेली सतरा वर्षें जो स्वराज्यसंग्राम चालविला, तो लोकमान्यांची स्मृति ठेवूनच चालविला, आणि हेंच त्यांचे खरे जिवंत स्मारक आहे, असेंच एकंदर हिंदी राष्ट्राचें मत आहे. तथापि लोकमान्यांचे अनुयायी म्हणवून घेणारे महाराष्ट्रांतच असे कांही मूठभर लोक आहेत की, त्यांना हिंदी राष्ट्रसभेच्या इतिहासांतील गेल्या सतरा वर्षांतील उज्ज्वल कामगिरी मुळीच मान्य नाहीं. तिनें आज जो अधिकारग्रहणाचा ठराव केला आहे, तेवढा मात्र त्यांना मान्य आहे; आणि तेवढ्याचमुळें सतरा वर्षांनंतर आजच राष्ट्रसभेला लोकमान्यांचें राजकारण समजलें आणि म्हणून आजच तिला त्यांची पुण्यतिथि साजरी करण्याचा खरा अधिकार प्राप्त झाला, असें या पक्षाचे अथवा गटाचें मत आहे. गटाचे असें म्हणण्याचा हेतु इतकाच कीं, आज आपल्या मताच्या बळावर एकादा पक्ष निर्माण करून त्याला लोकमान्यत्व मिळवून देण्याचें सामर्थ्यहि ह्या मडळींत राहिलेले नाहीं. अधिकारग्रहण आणि कायदेमंडळप्रवेश या दोन मुद्द्यांवर गेली सतरा वर्षें या गटानें एवढें मोठें रण माजविले आहे की, लोकमान्यांनीं आपल्या उभ्या आयुष्यांत या दोन गोष्टींव्यतिरिक्त दुसरें कांहींच केलें नाही कीं काय, असें सामान्य लोकांना वाटूं लागलें आहे! पण वस्तुतः लोकमान्यांनीं आपल्या आयुष्यांतील बहुतेक, किंबहुना सर्व कार्य कायदेमंडळाबाहेरच केले असून ते स्वतः एकदा कांही काळ कायदेमंडळाचे सभासद होते याची कोणास आठवणहि नाहीं; आणि अधिकारग्रहणाचा तर त्यांचा लेखांत, भाषणांत अथवा त्यांनी अगदी शेवटीं काढलेल्या 'कॉंग्रेस-डेमोक्रॅटिक' पक्षाच्या जाहिरनाम्यांत कोठेंच उल्लेखहि नाहीं. हे पाहिलें असतां लोकमान्यांचे राजकारण होतें तरी काय आणि त्यांची राजकारणांतील तात्त्विक भूमिका कोणती, याचा विचार वारंवार करणें भाग पडतें. लोकमान्यांच्या वर

उल्लेखिलेल्या अनुयायीगणानें केलेल्या राष्ट्रसभेवरील टीकेमुळें प्रस्तुत विषयाची नवी आवृत्ति प्राय: प्रतिवर्षीं ऑगस्ट महिन्यांत होत असते. यंदा बॅ. सावरकर हे सुटून आले आणि त्यांनीं लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आपण लोकशाही पक्षाचे सभासद झालों अशी पुणें येथें घोषणा केली. त्याच वेळी (१) संपूर्ण स्वातंत्र्य हें राजकीय ध्येय, ( २ ) साधनांची अनेकता, आणि ( ३ ) हिंदुत्वरक्षण, असे लोकमान्यांचें त्रिविध तत्त्वज्ञान म्हणून महाराष्ट्रीय जनतेपुढें त्यांनीं मांडिले. हें तत्त्वज्ञान हिंदुस्थानांतील केवळ लोकशाही पक्षानें चालविलें आहे व म्हणून आपण त्या पक्षाला जाऊन मिळतों, असेहि त्यांनी आपल्या कृतीचें समर्थन केलें. आज लाहोरच्या राष्ट्रसभेंत स्वातंत्र्याच्या ठरावाला विरोध करणारे श्री. न. चिं. केळकर यांच्या हातून स्वातंत्र्यवादी व हिंदुमहासभाभिमानी बॅ. सावरकर यांच्या हातीं लोकशाही पक्षाचीं सूत्रें जात असून राष्ट्रसभेला विरोध करण्याच्या भूमिकेवर, एके काळीं लोकमान्यांनाहि मवाळ म्हणणारे बॅ सावरकर व लोकमान्यांचे 'सावध' अनुयायी श्री. केळकर परस्पराशीं हस्तांदोलन करीत आहेत, हे पाहून क्षणभर कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. किंबहुना, महाराष्ट्रीय राजकारणांतील ही युति राजकीय वातावरणांत कांही आंदोलन निर्माण करील किंवा काय अशी जिज्ञासा कांहींना वाटूं लागली आहे. परंतु आजच्या या लेखाचा तो विषय नसून लोकमान्यांची राजकारणांतील तात्त्विक भूमिका कोणती आणि त्यांच्या राष्ट्रीयत्वाचें नित्य स्वरूप कोणतें यासंबंधी विवेचन करणें हा आजचा विषय आहे.

## महाराष्ट्रांतील तीन राजकीय पक्ष

आमच्या मतें महाराष्ट्रीय राजकारणांत तीन पक्ष निर्माण झाले आणि हे तीन पक्ष परस्परांहून भिन्न स्वरूपाचे आहेत. नेतृत्वाच्या किंवा पुढारीपणाच्या दृष्टीनें विचार करूं लागल्यास ( १ ) रानडे-गोखले यांचा एक पक्ष, (२) चिपळूणकर–टिळक यांचा दुसरा पक्ष, आणि ( ३ ) फडके-सावरकर यांचा तिसरा पक्ष, असे हे तीन पक्ष सांगतां येतील. आज राष्ट्रसभेशीं विरोध करण्यांत बॅ. सावरकर आणि श्री. केळकर हे एक होत असले, तरी महाराष्ट्राच्या अंत:करणावर सावरकरांच्या पंथाचा जो आद्य ठसा उमटला आहे, तो आजच्या लोकशाही पक्षाच्या राजकारणाहून फारच भिन्न स्वरूपाचा आहे, असें म्हटल्याविना राहवत नाहीं. ही गोष्ट पुण्यांतील 'स्टूडंट्स फेडरेशन' कडून त्यांचा जो सत्कारसमारंभ झाला त्या वेळीं स्पष्ट झाली असून १९०८–०९ मधील सावरकर महाराष्ट्रीय तरुणवर्गाला अद्यापि पूज्य वाटत

असले तरी आजच्या लोकशाही पक्षाची त्यांनी स्वीकारिलेलीं मतें तरुण महाराष्ट्राला मान्य नाहींत, हें त्या समारंभाच्या वेळीं उघड झाले आहे. रानडे-गोखले यांचा प्रागतिक-नेमस्त पक्ष, चिपळूणकर–टिळकांचा राष्ट्रीय–जहाल पक्ष आणि वासुदेव बळवंत फडके व सावरकर यांचा सशस्त्र–क्रांतिकारक पक्ष, असे तीन पक्ष महाराष्ट्रांत निर्माण झाले, आणि ज्याना लोकमान्याचे राजकारण समजून घ्यावयाचें असेल, त्यांनीं राष्ट्रीय–जहाल पक्ष हा, एका बाजूस नेमस्त–प्रागतिक पक्षाहून आणि दुसऱ्या बाजूस सशस्त्र–क्रांतिकारक पक्षाहून कसा भिन्न आहे तें यथार्थ रीतीने समजून घेणें अवश्य आहे.

लोकमान्यांच्या निधनानंतर राष्ट्रसभेची सूत्रें म. गांधीच्या हाती गेली आणि तिच्या राजकारणाची या सतरा वर्षांत फारच मोठ्या प्रमाणावर वाढ झाली. ही वाढ करण्यास म. गांधींची तपश्चर्या बहुतांशानें कारण झाली असली आणि त्यांच्या विशिष्ट मतांची छाया तिच्यावर कितीहि पडलेली असली, तरी तिने या काळांत अनुसरलेला मार्ग हा जसा रानडे-गोखल्यांच्या सनदशीर मार्गाहून निराळा आहे, त्याचप्रमाणें तो फडके-सावरकरांच्या सशस्त्र–क्रांतिमार्गाहूनहि भिन्न आहे, यांत शंका नाही. ना. गोखले, लो. टिळक आणि बॅ. सावरकर या तिघांच्या राजकारणापैकी लो. टिळकांच्या राजकारणाशीच गेल्या सतरा वर्षांतील राष्ट्रसभेचें राजकारण अधिक सदृश आहे; आणि स्थूल मानानें विचार केल्यास राष्ट्रसभेचा आजचा मार्ग हा नेमस्त–सनदशीर मार्ग किंवा सशस्त्र–क्रांतिमार्ग या दोहोंच्यामधील दिशेनें जाणारा असल्यानें तोच लोकमान्यांचा पुढील संकल्पित मार्ग होता असें दिसतें.

आज लोकमान्य हयात असते, तर राष्ट्रसभेनें बुद्धिपुरःसर सोडून दिलेल्या दोहों-पैकी कोणत्याहि मार्गानें न जातां ती ज्या मार्गानें त्यांच्यानंतर सतरा वर्षे चालत आली त्या निःशस्त्र क्रांतिमार्गावर ते राहिले असते, असे आमचें स्पष्ट मत आहे. इतकेंच नव्हे, तर श्री. केळकर यांनी तिला आपल्या मार्गावर ओढण्याचे केलेले प्रयत्न जसे विफल झाले, त्याचप्रमाणें बॅ. सावरकर यांनी तिला आपल्या जुन्या मार्गावर ओढण्याचा प्रयत्न केला असता तर तोहि तितकाच विफल झाल्याविना राहिला नसता, हें आज महाराष्ट्राला समजलें व पटले आहे. बॅ. सावरकर यांचा जुना मार्ग आणि श्री. केळकर यांच्या उपदेशानें स्वीकारिलेला त्यांचा नवा ‘ सावध ’पणाचा मार्ग, या दोहोंपेक्षां राष्ट्रसभेनें स्वीकारिलेला निःशस्त्र–क्रांतिमार्ग हाच लोकमान्यांचा संकल्पित मार्ग होता, हें दुसऱ्याहि एका गोष्टीवरून सिद्ध होण्याजोगें आहे. ती

गोष्ट म्हणजे, म. गांधींनी राष्ट्रसभेला या मार्गावरून दौडत नेण्याचा संकल्प केल्या-पासून आतांपर्यंत राष्ट्रसभेच्या कार्यात ज्यांनीं ज्यांनी धडाडीनें, उत्साहानें आणि स्वार्थत्यागानें भाग घेतला, त्यापैकी बहुतेक लोक स्वतःस गोखल्यांचे किंवा सावर-करांचे अनुयायी म्हणवीत नसून लोकमान्यांचेच अनुयायी म्हणवीत होते व आहेत. इतकेंच नाही, तर लो टिळक व म. गांधी या दोन विभूतीच्या मूळ प्रकृतीत जो भेद आहे तो लक्षांत घेऊन राष्ट्रसभेची आजची वृत्ति लोकमान्यांच्या वृत्तीसारखी आहे कीं म. गांधीच्या वृत्तीसारखी आहे असा सूक्ष्म प्रश्न जरी उपस्थित केला, तरीहि राष्ट्रसभेची वृत्ति लोकमान्यांच्या वृत्तीशीच अधिक सदृश आहे, असे विचारवंतास दिसून येईल लोकमान्याची मूळ प्रकृति राजकीय मुत्सद्याची असून म. गांधींची प्रकृति धार्मिक संताची आहे अर्थात् यांपैकीं राष्ट्रसभेच्या राजकारणाची भूमिका राजकीय मुत्सद्दीगिरीचीच असून ती धार्मिक संताची नाही हें उघड आहे तथापि राष्ट्रसभेनें गेल्या सतरा वर्षांत ज्या मार्गाचे अनुसरण केलें, त्या मार्गानें तिची प्रगति होण्यास म गांधींसारख्या धार्मिक संत-प्रकृतीच्या नेत्याचीच तिला आवश्यकता होती व केवळ राजकीय मुत्सद्याच्या हातून हें कार्य रेटलें गेले नसतें असेंहि आम्हांस वाटतें. आतां लोकमान्यांच्या राष्ट्रीय तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या अंगांचा थोडासा विचार करूं.

## राष्ट्रीय पक्षाचें धार्मिक अधिष्ठान

हिंदुस्थानांतील जहाल-राष्ट्रीय पक्षाचे जनकत्व लो टिळक यांच्याकडेच देण्यात येतें. या पक्षाचा जन्म महाराष्ट्रांत १८९५ च्या सुमारास झाला असें मानण्यास प्रत्यवाय नाही याच वर्षी महाराष्ट्रांत राष्ट्रसभा पहिल्या प्रथम झाली, याच वर्षी कै आगरकर हे मृत्यु पावले, याच वर्षी पुण्यातील सार्वजनिक सभा लो. टिळकांच्या हातीं आली, आणि याच वर्षी महाराष्ट्रांतील पहिला सार्वजनिक शिवाजी-उत्सव लो टिळकांनी साजरा केला अर्थात् अनेक कारणानी १८९५ हें वर्ष महाराष्ट्रांतील सार्वजनिक जीवनांत महत्त्वाचे बनलें आहे. यापूर्वी एक वर्ष लो. टिळकांनी गणेशो-त्सवाला राष्ट्रीय स्वरूप दिले. अशा प्रकारे आपल्या राष्ट्रीय चळवळींना धार्मिक व ऐतिहासिक आधार निर्माण करून प्रागतिक पक्षाला आपल्या विशिष्ट सुधारकी मतांमुळें जे जनतेचें अंतःकरण हस्तगत करतां आलें नव्हतें, तें त्यांनी आपल्या गणेशोत्सवाने व शिवाजी-उत्सवानें फार अल्प कालांत हस्तगत केलें. प्रागतिक सुधारकपक्ष गणपतीसारख्या बेढब मूर्तींच्या आराधनेनें मोक्षप्राप्ति किंवा परमात्मज्ञान

होऊं शकेल किंवा नाहीं, आणि शिवाजी हा परमेश्वराचा अवतार होता हें मानणें एकोणिसाव्या शतकांतील बुद्धिवाद्याला शोभतें किंवा नाही, या तात्त्विक विचारांचे कोडें उलगडण्यांत गर्क झाला असतां, लोकमान्यांनी या उत्सवांच्या आधारें जनतेला राष्ट्रीय स्वातंत्र्याचा मार्ग दाखवून दिला आणि धर्मभावनेचें तेज राष्ट्रीय भावनेंत निर्माण केले. राष्ट्रीय महोत्सवांचें वर्णन करतांना ते लिहितातः—

" मोठ्या जत्रांना प्रचंड सभांचे स्वरूप आम्हीं कां देऊं नये? तुमच्या राजकीय चळवळीचा प्रवेश खेड्यापाड्यांतील झोंपडींतहि अशा प्रकारे व्हावयाचा नाही काय? ......देव देतो पण कर्म नेतें अशांतली आमची स्थिति झाली आहे. लोक एका ठिकाणी जमण्याचे प्रसंग पूर्वजांनीं आयते तयार करून ठेविले, पण सुशिक्षित मंडळीला हे प्रसंग असून नसल्यासारखेच आहेत. आम्ही शिकलेले ही त्यांना ऐट आहे ना? लोकांत कसें मिसळावें? ह्यांना मोठी पंचाईत पडते ती हीच...प्रार्थनासमाजांत भक्तिभावाचे पोवाडे गात बसण्यापेक्षां लोकांत मिसळून न्यायमूर्तींसारख्यांनीं श्रीमंगलमूर्तीचे मंडपांत भक्तीच्या महिम्याचे वर्णन केलें, तर कितीतरी फायदे होणारे आहेत."

—लो टिळकांचे केसरीतील लेख · भाग १, पृ ५६९–५७०

शिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष होते, असें म्हटल्याबद्दल कांहीं सुधारकांनीं त्यांच्यावर टीका केली. त्याला आपल्या वेदान्ती तत्त्वज्ञानानें लोकमान्यांनीं पुढील-प्रमाणे उत्तर दिलें आहे.—

" अशा दृष्टीनें विचार केला, म्हणजे श्रीशिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष होते असें कबूल करावें लागतें. अवतारी पुरुष अथवा ईश्वराचा अंश म्हणजे ईश्वराच्या शरीराचे रक्तमांसादि घटकावयवाचे भाग ज्याच्या अंगांत अवतीर्ण झाले आहेत अशी व्याख्या आमचे शास्त्रांत तरी केलेली आमच्या आढळण्यांत नाही. ज्या अगाध व अज्ञेय शक्तीनें सर्व सृष्टीचे व्यवहार अबाधित चालले आहेत, त्या शक्तीचा थोडासा भाग प्रत्येक पुरुषांत अगर व्यक्तीत असतोच; पण प्रत्येक व्यक्तींत असणाऱ्या भागा-पेक्षां जास्त भाग जेव्हां आपणांस एकाद्या व्यक्तींत आढळून येतो, तेव्हां सदर व्यक्तीस ईश्वरी अंश म्हणण्याचा आमचा प्रघात आहे. ' यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंऽशसंभवम्॥ ' असें जे भगवद्गीतेंत म्हटले आहे तेंच अवतारी पुरुष ओळखण्याचे खरे लक्षण होय व हें लक्षण श्रीशिवाजीमहाराजांस

पूर्णपणें लागू पडतें, म्हणूनच त्यास अवतारी पुरुष म्हणण्यास हरकत नाहीं, असें आम्हीं लिहिलें होतें. ”

—उक्त ग्रंथ, पृ. ५४३

वरील युक्तिवादावरून लो टिळकांचा या वेळचा धार्मिक व सामाजिक प्रश्नांकडे पाहण्याचा दृष्टिकोण तत्कालीन सामाजिक व धार्मिक सुधारकांहून किती भिन्न होता तें दिसून येतें. मूर्तिपूजा आणि अवतारकल्पना या सर्वस्वीं त्याज्य होत, म्हणून त्यांच्यावर उघड हल्ला चढविणें हे आपलें कर्तव्य आहे, असें त्यावेळचे सर्व सुधारक समजत असत यामुळें त्यांना हा युक्तिवाद मान्य होणें शक्य नव्हतें. परंतु याच त्यांच्या मतांमुळें ते हिंदुस्थानांतील बहुजनसमाजापासून दुरावले होते. लोकमान्यांनीं या कल्पनांची हेटाळणी न करतां एक प्रकारे त्यांचें समर्थन चालविलें आणि त्याच आधारावर ते बहुजनसमाजांत राष्ट्रीय भावना फैलावूं लागले. यामुळें ते धार्मिक व सामाजिक सुधारणेला सर्वस्वीं विरुद्ध आहेत असा समज पसरला. परंतु हा समजहि चुकीचा होता. धर्मसुधारणेकडे व समाजसुधारणेकडे पाहण्याचा लोकमान्यां-चा दृष्टिकोण भिन्न होता, एवढाच याचा खरा अर्थ होता

एकोणिसाव्या शतकांत जे एकंदर धर्मसुधारक झाले त्यांचे तीनचार वर्ग पडतात. त्यांपैकी ब्राह्मसमाज किंवा प्रार्थनासमाज हा वर्ग, आर्यसमाज हा दुसरा वर्ग, आणि रामकृष्ण परमहंस, विवेकानंद किंवा रामतीर्थ यांचा पंथ हा तिसरा वर्ग, असे तीन मुख्य वर्ग असून कै. आगरकर यांच्यासारख्या शुद्ध बुद्धिवादी अशा थोडया लोकांचा चौथा वर्ग कल्पितां येईल. महाराष्ट्रांत रानडे हे प्रार्थनासमाजी, एकेश्वर-वादी असून आगरकर हे बुद्धिवादी होते. लो. टिळक हे वेदान्ती असून त्यांचीं मतें रामकृष्ण परमहंस, विवेकानंद किंवा रामतीर्थ यांच्या मतांसारखीं होती. प्रार्थना-समाजी रानडे किंवा बुद्धिवादी आगरकर यांच्यापेक्षां केवळ राष्ट्रीय अभिमानाच्या दृष्टीनें त्यांना आर्यसमाजाची विचारसरणी अधिक जवळची वाटत असली, तरी आर्यसमाजांतील संप्रदायप्रचाराची वृत्ति किंवा सर्व विश्वाला आर्यत्वाची दीक्षा देण्याचें ध्येय अथवा हिंदुस्थानांत हिंदुपदपादशाहीची पुनः स्थापना करण्याची मध्ययुगीन कल्पना, यांचा मागमूसहि त्यांच्या लेखांत किंवा भाषणांत कोणास आढळणार नाहीं. आगरकरांप्रमाणें तेहि एके काळीं बुद्धिवादी होते असा प्रवाद आहे व या बुद्धिवादांतून ते वेदान्तांत शिरले तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें

कांहींच कारण नाहीं. वेदान्त हा मानवबुद्धीला पूर्ण स्वातंत्र्य देऊनहि तिला आत्मनिष्ठ बनविण्याचे श्रेय संपादन करितो. वेदान्त हा शुष्क बुद्धिवादी नसून तो आत्मनिष्ठ बुद्धियोगी आहे. बुद्धि आत्मनिष्ठ बनली असतां ती शुद्ध आणि सम बनते; आणि शुद्ध व समत्वयुक्त बुद्धीला सामान्य इंद्रियांना अगम्य अशा जगदादि-कारणाचें स्वरूप साक्षात्कारानें समजतें. इतकेच नव्हे, तर हीच योगयुक्त बुद्धि जगाच्या व्यवहारांतील कोडी सोडविण्यासहि अधिक उपयोगी पडते, असा कर्मयोगी वेदान्ताचा सिद्धान्त आहे. अशा बुद्धियोगावर आरूढ झालेल्या स्थितप्रज्ञांनाच सामान्य लोक अवतारी पुरुष मानतात आणि त्याच्या असामान्य नेतृत्वावर विश्वास ठेवून आपले व्यवहार चालवीत असतात. वेदान्तातील या बुद्धियोगांत विवेक व श्रद्धा या दोहोंचीहि उपयुक्तता गृहीत धरली असून वेदान्त्याला मूर्तिपूजा व अवतारकल्पना यांत अनेक मूढ कल्पना समिश्र झालेल्या आहेत असें दिसत असलें, तरी त्या सर्वांच्या बुडाशी जी एक धर्मश्रद्धा आहे तिचे मानवी उन्नतीच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्व आहे हें त्याला दिसत असतें. यामुळे तो निर्गुण परमात्म्यापर्यंतचे तात्त्विक ब्रह्मज्ञान लोकांत फैलावत असतानाहि मूर्तिपूजा व अवतारकल्पना यांच्यावर समूळ आघात करू इच्छीत नाही. धर्माचाराचे हें बाह्यांग टिकाऊ नाही, भौतिक विद्येच्या प्रसारावरोबर तें हळूहळू गळून पडणार आणि त्यातील वेडगळ कल्पनांचा जाणूनबुजून त्यागहि केला पाहिजे हें खरें असलें, तरी वेदान्ती-सुधारकाचा मुख्य कटाक्ष धर्माचें अंतरंग सुधारण्यावरच विशेष असतो. हे अंतरंग सुधारण्याचे खरे साधन वेदान्तज्ञानाचा प्रसार करणे आणि वेदान्ताला प्रवृत्तिमार्गाची दीक्षा देणे हेंच असून धर्माचाराचें बहिरंग सुधारण्यास भौतिक विद्येचा प्रसार हें साधन आहे तसेंच वेदान्तात सर्वधर्म-समभाव आणि परधर्मसहिष्णुता ही तत्त्वे आधारभूत मानिली असल्यानें सर्व मुसलमानांना हिंदु बनवावे किंवा त्यांना हिंदुस्थानांत परकीयांप्रमाणें नांदवावें या कल्पना त्याला पोरकट वाटतात. आपल्या राष्ट्रीय कल्पनेला धर्माचा आधार घ्यावा असें जेव्हा वेदान्ती म्हणतो तेव्हा हा धर्म म्हणजे हिंदु धर्म, मुसलमानी धर्म किंवा खिस्ती धर्म, यांपैकी कोणता तरी एक धर्म असा त्याचा अर्थ नसतो. लोक-मान्यांच्या राष्ट्रीयत्वांत ‘ हिंदुत्वरक्षण ’ हे प्रमुख तत्त्व होतें असें म्हणावयाचें असेल, तर त्याच त्यांच्या राष्ट्रीयत्वांत मुसलमानत्व-रक्षण किंवा खिस्तीत्व-रक्षण हीं तत्त्वेंहि अंतर्भूत होतात असेंहि म्हणावें लागेल. वेदान्ती धर्मदृष्टीला हिंदु,

मुसलमान, ख्रिस्ती हे निरनिराळे धर्म नसून ते एकाच विश्वधर्माचे पथ दिसतात व या पंथांनी जाणाऱ्यांनी आपली संकुचित सांप्रदायिकता सोडली म्हणजे त्यांत बंधुभाव व एकराष्ट्रीयत्व निर्माण होऊ शकतें, असा त्याचा दृढ विश्वास असतो. धर्म ही बाह्य विधिविधानांची गोष्ट नसून अंतःशुद्धीची व आत्मसाक्षात्काराची गोष्ट आहे, हें ज्यांनी ओळखिले त्याना सर्वधर्मैक्य पटूं शकतें हिंदुस्थानासारख्या नानाधर्मविशिष्ट राष्ट्रात सर्वांना एकधर्मी बनविणे किंवा सर्वांनाच भिन्नधर्मी बनविणे, हा राष्ट्रीयत्व निर्माण करण्याचा मार्ग नसून प्रत्येक धर्मातील संकुचित वृत्ति नष्ट करून सर्वांची अंतःशुद्धि करणे हाच तो मार्ग आहे, असें वेदान्ती मनुष्याला वाटतें. लोकमान्यांनी याच व्यापक धर्मभावनेचा आपल्या राष्ट्रीयत्वाला आधार घेतला होता व म्हणून त्याची हिंदु-मुसलमानाच्या ऐक्यावर आरंभापासून शेवटपर्यंत दृढ श्रद्धा होती. हिंदु-मुसलमानाचे दंगे होतात याच्या पाठीमागे साम्राज्यशाहीचे राजकारण आहे, ही गोष्ट त्यांनी १८९३।९४ साली महाराष्ट्रात हिंदु मुसलमानांचे दंगे झाले, त्यावेळी पुढील शब्दांत स्पष्टपणे लोकनिदर्शनास आणिली. "**दंगा कोण करतो?**" या मथळ्याच्या ता १८ डिसेंबर १८९४ च्या 'केसरी'तील अग्रलेखात ते लिहितातः—

"बहुतेक दंग्याचा इतिहास पाहिला तर तीन अवस्था दिसतात. प्रथम हिंदु आपल्या हक्काला चिकटून बसतात; मग मुसलमान उघड मारामारी सुरू करितात; नंतर ती चालवून शेवटास लावण्याचे काम पोलीस मोठ्या नेटानें करतात. हिंदु लोक वाद्ये वाजविण्याच्या हक्काकरिता भाडतात तो वेडेपणा असेल, पण दंगेखोर-पणा तरी नाही एवढे खरे मुसलमान लोक प्रथम मारामारी करितात, पण त्याला त्यांचें अज्ञान व आडदांडपणा हीच कारणे असल्यामुळें त्यानाहि फारसा दोष देतां येत नाही, फार तर अडाणीपणामुळें लबाड व विघ्नसंतोषी लोकांच्या थापांस भुलून ते दंगा करण्यास प्रवृत्त होतात एवढ्याबद्दल त्याची कीव करता येईल. आमच्या मुसलमानबंधूस आपले हित कळत असतें, तर त्यांनी हिंदूंशी कधीहि तंटा केला नसता, पण तें त्यांना कळत नाही व कांही विघ्नसंतोषी लोक त्याना स्वस्थ बसूं देत नाहीत, याला त्यांचा तरी काय इलाज? जसजसा त्याच्यात शिक्षणप्रसार होत जाईल तसतसा त्यांचा वेडेपणाहि त्यांना दिसूं लागेल. एवढ्याकरिता आम्ही प्रस्तुत दंग्याबद्दल मुसलमानांनाहि फारसा दोष देत नाही. पडद्यामागें सूत्रधार आहे तोंपर्यंत त्याला बाहुल्या हव्या तितक्या मिळूं शकतात, लोकांत

फुटाफूट करणारा घरभेद्या पाहिजे तसा मिळतो, व एका ढोंगानें कार्य साधेनासें झाले, तर तो दुसरे हुडकून काढतो "

—उक्त ग्रंथ, पृ. ३८६

१८९५ साली ' राष्ट्रीय सभा ' या विषयावर लिहितांना ते म्हणतात:-

" ही राष्ट्रीय सभेची चढती कळा पाहून आमच्या ॲंग्लो-इंडियन हितशत्रूंस फारच धास्ती उत्पन्न झाली........आतां हिंदुस्थानांतील इंग्रजांचे राज्य ऊर्फ गोऱ्या कामदारांची चैनबाजी खास बुडणार असें त्यास वाटूं लागले. या अनर्थाला कारण राष्ट्रीय सभेनें सुरू केलेली राजकीय चळवळ असेंहि त्यांच्या मनानें घेतलें, व म्हणून 'मूले कुठारः' करण्याकरितां सामदामापैकी चौथा उपाय योजण्याचा कित्येकांनी प्रयत्न केला. सर सय्यद अहंमद प्रभृतींना बगलेंत मारून मुसलमानांस फितविण्यास प्रारंभ झाला ...... १८९३ च्या जूनचा सिव्हिल सर्व्हिस-संबधीचा पार्लमेंटचा अनुकूल ठराव झाला नसता, तर ऑगस्टपासून हिंदु-मुसलमानांचे तंटेहि कदाचित् सुरू झाले नसते असें पुष्कळांस वाटतें; व तें अगदीच निर्मूल असेल असें आमच्यानें म्हणवत नाही. "

—उक्त ग्रंथ, पृ. ३९९

हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांच्या ऐन भरांतहि त्यांच्या आदिकारणासंबंधीचे अचूक निदान करणारी लोकमान्यांची राजकीय बुद्धि त्यांना कधीहि सोडून गेली नाहीं; आणि मुसलमानांतील आडदांड व अज्ञान वृत्तीचा त्यांनी योग्य शब्दांत निषेध केला असला तरी आपण त्याविषयींहि मुसलमानांना एकसारखा दोष देत न बसतां त्यांची कीव करावी आणि पडद्यामागील सूत्रधारांच्या हातची सूत्रें आपल्या हाती कशीं येतील याच मुख्य प्रश्नावर राष्ट्राचे लक्ष केंद्रित करावें ही योगबुद्धि त्यांनीं कधीहि ढळूं दिली नाही. हिंदु-मुसलमानांचें ऐक्य साधणे हे ध्येय आकाशपुष्पाप्रमाणें असाध्य आहे, असे तर त्यांनी कधीं ध्वनित केलें नाहींच तर त्यांच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या भावनेची तीव्रता कधीं कधीं इतकी वाढत असे कीं, तिच्या भरांत " इंग्रजांनी सर्व स्वराज्य मुसलमानांना बहाल केलें तरीहि मला तें चालेल," असे ते म्हणत असत. लखनौ येथे त्यांनी याच राष्ट्रीय भावनेने हिंदु-मुसलमानांचा करार केला व ती भावना त्यांनीं उघडपणे बोलूनहि दाखविली. तात्पर्य, लो० टिळक हिंदुत्वाचे पूर्ण अभिमानी होते व राष्ट्रभावनेला त्यांनीं धर्माचें

अधिष्ठान दिलें होतें हें खरे असले, तरी ते धर्मभावनेनें वेडे झालेले नव्हते व माथेफिरूपणानें हिंदुत्व-रक्षण होऊं शकेल अशी त्यांची मुळीच कल्पना नव्हती.

बॅ. सावरकर, डॉ. मुंजे किंवा श्री. भोपटकर यांच्या धार्मिक विचारांची ठेवण पाहिल्यास ते लोकमान्यांप्रमाणें वेदान्ताच्या सहिष्णु व व्यापक तत्त्वज्ञानावर अधिष्ठित झालेले नसून ते सर्व आर्यसमाजी वळणावर गेलेले आहेत; किंबहुना, त्यांच्या विचारांवर मुसलमानांचा प्रतिकार करण्यासाठीं माथेफिरू सांप्रदायिकांच्या वृत्तीचा मुलामा दिलेला आहे कीं काय असाहि भास होतो. यामुळेच लोकमान्यांच्या राष्ट्रीय वृत्तीचें धार्मिक अधिष्ठान व या लोकांचें धार्मिक अधिष्ठान यांत महदंतर असल्याचें विचारवंतांच्या निदर्शनास आल्याविना रहात नाही.

आधुनिक हिंदी राष्ट्रीयत्व हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याच्या पायावरच आधारलें पाहिजे व आज ना उद्यां मुसलमान समाजाला आपण पूर्ण राष्ट्रीय बनवूं शकूं, या सिद्धान्तावर टिळकांची श्रद्धा आमरण होती, ती कधींहि ढळली नाही मरणापूर्वी थोडेच दिवस उपस्थित झालेल्या खिलाफत प्रकरणांत मुसलमानांना पूर्ण पाठिंबा देण्याचें धोरण त्यांनी आपल्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्यांत अग्रभागीं उल्लेखिले होतें. त्या जाहिरनाम्यांतील पुढील वाक्यें पहा:-

" धार्मिक बाबतीत सहिष्णुता असावी आणि स्वतःपुरता ज्याचा त्याचा धर्म ज्याला त्याला पवित्र असून इतरांनी त्यांत बिघाड करण्याचा प्रयत्न केल्यास त्यापासून त्या धर्माचें रक्षण करणे हें सरकारचें न्याय्य कर्तव्य आहे, असे या पक्षाचें मत आहे. तसेच, मुसलमानांच्या धार्मिक भावना व कुराणांतील वचनें यांस अनुसरून खिलाफतीचा प्रश्न सोडविला जावा अशी जी मुसलमानांची मागणी आहे, तिला या पक्षाचा पाठिंबा आहे."

—उक्त ग्रंथ, भाग ३, पृ. ४७९

या उताऱ्यांत " हिंदुत्व-रक्षण " असें संकुचित तत्त्व उल्लेखिण्यांत आलें नसून धर्मसहिष्णुतेचें व्यापक तत्त्वच उल्लेखिण्यांत आलें आहे, आणि ज्याचा धर्म त्याला स्वतःपुरता पवित्र असल्यानें प्रत्येक धर्माचें रक्षण करणें हें सरकारचें कर्तव्य आहे, असें धोरण आंखण्यांत आलें आहे. राष्ट्रसभेचें आजहि हेच धोरण आहे आणि म्हणून या बाबतीत व खिलाफत प्रकरणी मुसलमानांना पाठिंबा देण्यांत राष्ट्रसभेचें धोरण व लोकमान्यांचें धोरण यांत फरक पडला आहे असें कोणासहि निःपक्षपात-

बुद्धीनें म्हणतां यावयाचे नाही. परंतु धर्मसहिष्णुतेचे तत्त्व विसरून ज्यांनी केवळ "हिंदुत्व-रक्षण" हाच आपल्या राष्ट्रीयत्वाचा मूलाधार बनविला आहे, त्यांना राष्ट्रसभेंत स्थान मिळणार नाही आणि आमच्या मतें त्यांना लोकमान्यांच्या राजकारणावरहि वारसा सांगतां येणार नाही. धर्मसहिष्णुता हा आधुनिक राष्ट्रीयत्वाचा आधार होऊ शकेल, पण केवळ हिंदुत्व-रक्षण हा तो आधार होऊं शकणार नाही, हें लोकमान्यानी पूर्णपणे ओळखिले होतें. म्हणूनच त्यांनी लखनौ-करार केला व खिलाफत प्रकरणी मुसलमानांना पाठिंबा दिला मुसलमान समाजातील माथेफिरूपणा कमी करण्यावर त्यांचा विश्वास होता, हिंदुसमाजांत माथेफिरूपणा वाढविण्यावर त्यांचा विश्वास नव्हता. भोपटकर-सावरकर प्रभृतीचा राष्ट्रसभाद्रोही लोकशाही पक्ष व टिळकांचा राष्ट्रसभानिष्ठ लोकशाही पक्ष यातील मूलभूत भेद हाच आहे

## राष्ट्रीय स्वातंत्र्य व त्याचें स्वरूप

"संपूर्ण स्वातंत्र्य" हें लोकमान्याचें ध्येय होतें, हें बॅ. सावरकर याचे मत आज सर्वांना पटलेलें आहे तथापि त्यांचा स्वातंत्र्याचा आदर्श कोणता होता, त्यांना लोकशाही तत्त्वत· मान्य होती किंवा नाही, लोकशाहीत अंतर्भूत होणाऱ्या सामाजिक समतेवर व सामान्य जनतेच्या स्वातंत्र्यावर त्याचा विश्वास होता किंवा नाही, ब्राह्मण्यासंबंधी व एकंदर हिंदु–संस्कृतीसंबंधी त्यांना अत्यंत आदर असला तरी हिंदुपदपादशाही, किंबहुना पेशवाई स्थापन करणे हेच त्याचे ध्येय होतें कीं काय, आजकाल युरोपांत लोकशाही नष्ट होत असता त्यांचा लोकशाहीवर विश्वास टिकून राहिला असता, की ते भांडवलशाहीतून निर्माण होणाऱ्या फॅसिझमचे पुरस्कर्ते झाले असते, या व अशा प्रश्नांसंबंधी आजच्या लोकशाही पक्षाची जी मतें आहेत आणि "हिंदुस्थान हा हिंदूंचाच आहे" इत्यादि घोषणात व्यक्त होणारी या पंथांतील लोकांची जी वृत्ति आहे, त्याचा विचार केला असता लोकमान्यांचे राजकीय तत्त्वज्ञान या त्यांच्या अनुयायांना कितपत यथार्थ समजलें आहे, याविषयीं लोकांस बरीच शंका येते या दृष्टीनें शिवाजी-उत्सवाकडे पाहण्याचाहि त्याचा दृष्टिकोण कोणता होता, केवळ हिंदुपदपादशाहीचे संस्थापक या दृष्टीनेंच ते शिवाजीमहाराजांना मानीत होते, की एका जुलमी परकीय राजसत्तेविरुद्ध क्रांतीचा झेंडा उभारणारा एक स्वातंत्र्यवीर या दृष्टीनें ते त्यांच्या चरित्राकडे पहात होते, या प्रश्नाला महत्त्व प्राप्त होतें. शिवाजीकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोण हिंदुपदपादशाहीचा संस्थापक एवढाच नसून, स्वकालीन जुलमी राजसत्तेविरुद्ध लढणारा

जगाच्या इतिहासांतील एक असामान्य स्वातंत्र्यवीर असा व्यापक होता, असें त्यांनीं अनेक वेळा बोलून दाखविलें आहे. कलकत्त्यास शिवचरित्रावर बोलतांना ते म्हणाले, "Shiwaji did not fight against the Mohamedans, but against the tyrannical power that existed at that time." तसेंच त्यांची राष्ट्रीय स्वातंत्र्याची कल्पना लोकशाही राज्याची होती आणि या लोकशाही कल्पनेंत जातिभेदापासून उत्पन्न होणारी जन्मजात विषमता नष्ट करणें आणि धर्मसहिष्णुता स्वीकारून प्रत्येकाच्या धर्माचें त्याच्यापुरतें संरक्षण करणें या कल्पनाहि अंतर्भूत होत होत्या. धर्मसहिष्णुतेविषयीं मागे लिहिलेच आहे आतां जातीय विषमतेसंबंधी पुढील वाक्य राष्ट्रसभानिष्ठ लोकशाही पक्षाच्या जाहिरनाम्यांत आढळतें:—

'हिंदी राष्ट्रापुढील प्रश्नाचे निकाल लावण्याचे सामर्थ्य लोकशाहीच्या तत्त्वांत आहे व तें कार्य साधण्याला शिक्षणप्रसार आणि मतदारांच्या सख्येची वाढ ही दोन अमोघ शस्त्रे आहेत, असें या पक्षाचें मत आहे जातिभेद अथवा रूढी यांमुळें नागरिक, व्यावहारिक व सामाजिक बाबतींत जी कोणाची नालायकी समजली जात असेल ती नालायकी दूर करण्यात यावी, असे हा पक्ष प्रतिपादन करील."

—उक्त ग्रंथ, पृ. ४७१

सामाजिक सुधारणा किंवा जातीजातींतील समता यासंबंधींचा त्यांचा दृष्टिकोण त्यांनी दुसऱ्या एका ठिकाणी पुढीलप्रमाणें विशद केला आहे:—

"स्वाभिमान, हुरूप, स्वराज्यनिष्ठा हाच राष्ट्राचा खरा जीव होय, आणि हा जिवंतपणा जेथें वसत आहे, त्या ठिकाणी सुईच्या मागे जसा दोरा तद्वत् सामाजिक सुधारणाहि मागोमाग येत असतात, अशी इतिहास साक्ष देत आहे. म्हणून राष्ट्रीय पक्ष राजकीय चळवळीस जितकें महत्त्व देतो, तितकें समाजिक चळवळीस देत नाही. राष्ट्राची सामाजिक प्रगति होऊ नये असें त्याचें म्हणणें नाही, पण ती राजकीय प्रगतीच्या व स्वाभिमानाच्या अनुषंगानेंच झाली पाहिजे. राजकीय परवशता फार तर मुळमुळीत विरोधानें स्वीकारून जिवंत सुधारणा होणेंच शक्य नाहीं, असे राष्ट्रीय पक्षाचें तत्त्व आहे.'

—उक्त ग्रंथ, पृ. ४३६

दुसऱ्या एका ठिकाणीं स्वराज्याची कल्पना आज कशी विकास पावत आहे आणि केवळ स्वदेशी राजाचे राज्य म्हणजे स्वराज्य, ही कल्पना मागें पडून प्रजासत्ताक राज्य म्हणजे स्वराज्य, ही कल्पना कशी प्रभावी बनत आहे, त्यासंबंधीं ते लिहितात:—" जगांत शिक्षणाचा जितका जितका अधिकाधिक फैलाव होईल त्या मानानें केवळ स्वदेशी राजा आणि सुव्यवस्थित राज्यकारभार एवढयानें लोकांची तृप्ति होणें अधिकाधिक दुर्घट होत जाईल इतकेंच नव्हे, तर ' प्रजासत्ताक राज्याखेरीज खरे स्वराज्यच नाही, ' असे म्हणण्यापर्यंतहि लोकांची मजल येऊन ठेपेल, आणि याखेरीज दुसरें राज्य सुराज्य होणें नाहीं असेंहि लोकांस वाटूं लागेल. स्वराज्य आणि सुराज्य याची ही अंतिम एकवाक्यता होय. "

—उक्त ग्रंथ, पृ. १७५

तात्पर्य, स्वराज्याची कल्पना शिवाजीच्या वेळी जी होती तीच आज उरलेली नाही व जसजसा काळ जाईल त्या मानाने ती बदलत जाईल. स्वराज्याची कल्पना अनियंत्रित राजसत्तेंतून लोकसत्तेपर्यंत विकास पावत आली आहे, हे जाणूनच लोकमान्यांनी ' **कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचे ब्रीद** ' सागतांना " **कॉंग्रेसच्या डेमोक्रॅटिक पक्षाचें धोरण त्याच्या नांवावरूनच व्यक्त होत असून कॉंग्रेसविषयीं अढळ निष्ठा आणि डेमॉक्रसी** (लोकशाही) **वर दृढ विश्वास हें त्यांतील बीज होय** " असें ठरवून दिले. लोकमान्यांचें राष्ट्रीयत्व हें लोकसत्ताक होतें, हे यावरून सुस्पष्ट होतें. असें असतां आजच्या लोकशाही पक्षानें कॉंग्रेसविषयीं अढळ निष्ठा सोडून सतत विरोध स्वीकारिला आहे. इतकेंच नव्हे, तर त्याचा लोकशाहीवरहि दृढ विश्वास उरला नसून त्याला ' फॅसिझम् ' पसंत पडूं लागला आहे ! " लोकमान्य आज हयात असते तर ते फॅसिस्ट झाले असते, " असे उद्गार श्री. केळकर यांनी १९३६ च्या १ ऑगस्ट रोजीं काढले होते, हे सुप्रसिद्धच आहे. अशा प्रकारे ' कॉंग्रेस ' व ' डेमॉक्रसी ' अथवा 'राष्ट्रीयत्व' व 'लोकशाही' या लोकमान्यप्रणीत दोनहि तत्त्वांवर ज्यांचा विश्वास उरला नाही, त्यांना लोकमान्यांचें राजकारण उमगलें आहे, असें लोकांना तरी कसें वाटावें ? हिंदी राष्ट्रीयत्वाचा विकास आज लोकसत्तेंतून समाजसत्तेंत होऊं लागला आहे. कारण, भांडवलशाहीमुळें लोकसत्ता ही धनिकसत्ता बनली आहे, हें युरोपखंडाच्या इतिहासावरून स्पष्ट झालें आहे. साम्राज्यशाही व भांडवलशाही यांच्यामुळें इंग्लंडांतील लोकशाही नष्ट होईल व तेथील राजसत्ता थोडया वर्गाच्या

हातीं जाऊन तेथे लष्करशाही माजेल, असें भविष्य लोकमान्यांनी एका लेखांत केलें आहे. ता. १६ डिसेंबर १९०२ रोजी केसरींत लिहिलेल्या " **पाच्छाहीपणा कीं गुलामगिरी?** " या लेखांत ते म्हणतात, " इंग्रज लोकांची राज्यतृष्णा अनिवार झाली असल्याकारणानें पैसेवाल्या लोकांचें प्राबल्य तर वाढत चाललेच आहे; परंतु या सधन लोकांपेक्षांहि लष्करी लोकाचें महत्त्व अधिकाधिक होत चालले आहे.... अशा रीतीनें थोडया लोकांच्या हातीं सत्ता देऊन त्यांच्या हुकुमाप्रमाणे वागण्याचा प्रसंग आज इंग्रजी समाजास आला असला,...तर इंग्रजी राष्ट्र अधिकाधिक गुलाम बनत चालले आहे, ही गोष्ट सिद्ध होत नाही काय? तसेंच बुद्धीस जो मान मिळत असे, ती मिळण्याचें नष्ट होऊन आज शारीरिक बळासच जर इंग्रजी समाज अधिक मान देत आहे, तर इंग्रज लोक सुधारणेच्या मार्गावरून रानटीपणाच्या मार्गास लागत चालले आहेत, ही गोष्टहि कबूल करणे भाग नाहीं काय? ...या राज्यलोभामुळें व पाच्छाहीपणामुळें इतर देशाचेंच नव्हे, तर स्वतः इंग्लडचे नुकसान होत आहे व त्यापासून दूर राहणे हें इंग्रजी राष्ट्राचे कर्तव्य आहे. "

—उक्त ग्रथ, भाग २, पृ. ३८१-८३

यावरून युरोपांत साम्राज्यवादामुळें धनिकशाही व लष्करशाही वाढत असून लोकशाही नष्ट होत आहे हें लोकमान्यांना दिसत होतें; पण लोकशाहीतून धनिकशाही व लष्करशाही यांत होणारे हें पर्यवसान उन्नतिकारक नसून ती युरोपखंडाची अधोगति आहे व तिच्यामुळें इंग्रजी राष्ट्र रानटी बनूं लागलें आहे, असें लोकमान्य लिहितात. यावरून त्याचा लोकशाहीवर किती दृढ विश्वास होता तें स्पष्ट होतें. म्हणूनच **लोकमान्यांच्या राजकारणांतून फॅसिझमचा विकास न होतां समाजसत्तेचा विकास झाला असता**, असें आम्ही म्हणतों. याच विषयाचा आणखी एका दृष्टीनें विचार करतां येईल. लोकमान्यांच्या काळीं जे सुशिक्षित मध्यमवर्गीय तरुण निघत होते ते जनतेशीं आपला संबध तोडून लोकांचा तिटकारा करीत असत. त्यांना आपल्या इंग्रजी विद्येमुळें अहंकार झाला होता आणि त्यांना कांही विद्वान् लोक उद्योगधंद्यांत पडून केवळ द्रव्यार्जनाच्या पाठीमागे लागण्याचा उपदेश करीत होते त्यांस उद्देशून लोकमान्य लिहितातः—" इंग्रजी विद्येनें ब्राह्मणांच्या अंगीं जो विनाकारण अहंभाव उत्पन्न झाला आहे, तो त्यांनीं सोडला पाहिजे. सर्व प्रकारच्या, सर्व दर्जाच्या व सर्व जातींच्या लोकांत मिसळून किंबहुना, त्यांच्यांत व त्यांच्याप्रमाणें राहूनहि त्यांनीं आपली स्थिति कशी सुधारावी हें

समजावून दिले पाहिजे. हे लोक पशू आहेत म्हणून त्यांचा तिरस्कार करणे हा कांही पुरुषार्थ नाहीं. त्याचा व आमचा गळा एके ठिकाणीं बांधलेला आहे; व अखेरीस आम्हांस जर कोणी तारणार किंवा मारणार असला तर हेच तारतील किंवा मारतील क्षणभर युरोपियन लोकांत मिसळून वाहवा मिळविल्यानें आमचा कांहीं निभाव लागणार नाही, अगर युरोपियन राज्यकर्ते आमची विद्वत्ता पाहून आम्हास कोणत्याहि प्रकारचे हक्क देणार नाहीत...ख्रिस्ती मिशनरी लोकांस कुळंब्या-माळ्यांत अगर महारापोरांत मिसळण्यास जर लाज वाटत नाहीं, तर आमच्या सुशिक्षित तरुण लोकांस ती कां वाटावी?...हे काम जेव्हां आपले लोक करूं लागतील, अथवा याकरितां जेव्हां ग्रॅज्युएट रामदासी हिंदुस्थानांत अगर इतर देशांत सचार करीत असलेले आढळण्यांत येतील, तेव्हांच आमच्या अंगी असलेल्या गुणांचा कांही विकास झाला तर होईल व स्थिति सुधारेल. नाहीपेक्षा परकीय राज्याखालीं क्षीणबल होत जाऊन अखेरीस रोमच्या विस्तृत राज्यांतील प्रजेची ज्याप्रमाणे स्थिति झाली, त्याप्रमाणें आमची स्थिति होईल की काय अशी भीति वाटत आहे."

—उक्त ग्रंथ, भाग ४, पृ. २३२-३४

तात्पर्य, सुशिक्षित मध्यमवर्गानें सुखाच्या व नोकरीच्या मागें लागून वरिष्ठ वर्गांत शिरण्याचें व जनतेला लाथाडण्याचे ध्येय न स्वीकारतां जनतेंत मिसळण्याचें व तिची निष्काम बुद्धीनें सेवा करण्याचें ध्येय स्वीकारावें, जनताच आम्हांला तारील किंवा मारील, परकीय साम्राज्यांतील सुखाच्या सत्तेच्या मोहानें अंध झालेला वरिष्ठ वर्ग आम्हांस तारणार नाहीं; आपला गळा माळ्याकुळंब्यांच्या व महारा-पोरांच्या गळ्यांशी बांधलेला आहे आणि म्हणून त्यांच्यांत जागृति करणे, त्यांची सेवा करणे व त्यांची संघटना करणें हाच आपल्या राष्ट्रीय विकासाचा मार्ग आहे; असें आपण केलें नाहीं, तर रोमन साम्राज्यांतील पूर्वीचे ब्रिटन लोक नष्ट झाले तसे आपण नष्ट होऊं, असा त्यांचा सुशिक्षित वर्गाला एकसारखा उपदेश होता. यालाच ते 'ब्राह्मण्याचे संरक्षण' असे म्हणत असत. ब्राह्मणांच्या गिरण्या काढून ब्राह्मण्यरक्षण होईल अशी त्यांची कल्पना नव्हती. म्हणूनच त्यांच्या उपदेशांत फॅसिझमचीं बीजें नसून समाजवादाचीं बीजे आहेत, असें म्हणतां येतें. युरोपचें अंधानुकरण त्यांना नको होतें व युरोपने लोकशाही सोडली नाही म्हणून आपणहि ती सोडावी असें त्यांना वाटत नव्हतें व वाटलें नसतें. उलट, लोकशाही सोडणें

हा युरोपचा अधःपात आहे असेंच ते म्हणाले असते. त्याचें राष्ट्रीयत्व धनिक-वर्गाच्या सहाय्यावर आधारलेलें नसून सामान्य जनतेच्या सहाय्यावर आधारलेलें होतें.

## साधनांची अनेकता

बॅ. सावरकर यांनी लोकमान्यांच्या राष्ट्रीय किंवा राजकीय तत्त्वज्ञानात "साधनानामनेकता" हें त्यांच्याच धर्मलक्षणांतील जें एक तत्त्व घुसडून दिलें आहे, त्याचा आतां विचार करू. एकंदर जगाच्या इतिहासांत निरनिराळ्या लोकांनीं आपलें गेलेलें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठी कोणकोणत्या साधनांचा उपयोग केलेला आहे, असा सर्वसामान्य प्रश्न जर लोकमान्यांना कोणी केला असता, तर त्यांनी त्याचें तात्त्विक उत्तर "साधनांची अनेकता" असेच दिलें असतें याविषयीं आम्हांस शंका नाही. परंतु "विशिष्ट परिस्थितीत, विशिष्ट लोकांनी, विशिष्ट प्रकारचें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठी काय केलें पाहिजे?" असा जेव्हां प्रश्न उपस्थित होतो, तेव्हां त्याला केवळ "साधनानामनेकता" एवढें उत्तर देऊन काम भागत नाही. तसें असतें तर त्यांनी प्रागतिकांच्या सनदशीर मार्गाची जी हेटाळणी जन्मभर केली ती, किंवा सशस्त्र-क्रांतिवादापासून स्वतः अलिप्त राहून त्याचा जो वेळो-वेळीं निषेध केला अथवा त्या मार्गास लागलेल्या देशभक्तांना त्यापासून निवृत्त करण्याचा जो प्रकट अथवा अप्रकट प्रयत्न केला, तो असमर्थनीय ठरण्याची आपत्ति आली असती. हिंदुधर्माचें सर्वसंग्राहकत्व व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं त्याचें जे लक्षण म्हणून सांगितलें, त्यांतसुद्धा त्यांना बऱ्याच वर्षांच्या विचारानंतर "हिंदूंचे विशिष्ट संस्कार पाळणारा तो हिंदु", असें एक अधिक लक्षण घालण्याची आवश्यकता वाटली व तशी दुरुस्ती त्यांनीं मंडालेहून सुटून आल्यानंतर 'चित्रमयजगत्'मध्यें स्वतंत्र लेख लिहून केली, हें सर्वश्रुत आहे. त्याचप्रमाणे व्यावहारिक राजकारणांत विशिष्ट लोकांचें विशिष्ट परिस्थितीत नेतृत्व करीत असतांना केवळ "साधनानामनेकता" हें उत्तर देऊन काम भागत नाहीं. आपल्या परिस्थितीचा साकल्यानें विचार करून विशिष्ट साधनांचेंच अवलंबन केले पाहिजे, असें निश्चित सांगावें लागतें. आपणांस बरोबर वाटणाऱ्या मार्गाच्या मर्यादा आंखून घ्याव्या लागतात; त्या मर्यादांचें कोणी उल्लंघन केल्यास त्यावर टीकेचें शस्त्र उगारावें लागतें; आणि त्या मर्यादांच्या आंत राहणाऱ्यानीं कोणत्या वेळीं काय करावें, यासंबंधीं शिस्त कोणी घालून द्यावी व ती कोणती असावी, याचा प्रत्येक लोकनायकाला स्वतंत्र

बुद्धीनें, किंबहुना, योगयुक्त बुद्धीने निर्णय करावा लागतो लोकमान्यानी असा निर्णय केला होता तो केवळ आपल्या आयुष्यापुरताच नव्हे, तर आपल्या निधनानंतर राष्ट्राचें राजकारण दहापंधरा वर्षे कोणत्या दिशेनें आणि कोणत्या मार्गानें चालेल, याविषयी त्यांचे निश्चित विचार होते व त्याप्रमाणेच त्यांच्या निधनानंतर आजपर्यंत राष्ट्राचे राजकारण सामान्यतः चालत आले आहे. म्हणूनच लोकमान्यांची कीर्ति एकसारखी वाढत आहे त्यांनी शिवाजीमहाराजांचा उत्सव केला म्हणून महाराजांचींच साधने आज आपणास उपयोगी पडतील किंवा त्या साधनाचे अधानुकरण केल्याने एकाद्या व्यक्तीस 'शिवाजीपण' प्राप्त होईल, अशी त्याची कल्पना नव्हती. याच्या उलट, आपली परिस्थिति पाहून तिला अनुसरून अशी नवी साधनें जो शोधून काढील तोच आज शिवाजी होईल, असेच त्यांचें स्पष्ट मत होतें. शिवाजी-उत्सवासंबंधी लिहिलेल्या एका लेखात ते म्हणतातः—

"श्रीशिवाजीमहाराजांनी चंद्रराव मोरे अगर अफझुलखान यांचा वध करविला अगर केला म्हणून पुढे होणाऱ्या थोर पुरुषानें दुसऱ्या एकाद्या हिंदूचा अगर मुसलमानाचा वध केलाच पाहिजे असें नाही, व ज्यांनी शिवजयंतीचा उत्सव प्रचारांत आणण्याची खटपट केली त्याचा असा मनोदयहि नाही...शिवजयंति करण्याचा उद्देश उद्यां एका 'क्ष' नें उठून मी शिवाजी म्हणून 'ज्ञ' स मारावयास प्रवृत्त व्हावे असा नाही. ... **थोर पुरुषाचें लक्षणच हें आहे कीं, सभोंवतालची स्थिति पाहून तो आपल्या साधनांची योजना किंवा निवड करीत असतो**, व या त्याच्या कामास त्याच्या प्रयत्नाबाहेरील गोष्टीची मदत मिळून त्यास यश आलें, म्हणजे त्याचा थोरपणा लोकांस कळून येतो."

—उक्त ग्रंथ, भाग १, पृ. ५४६–४७

असो. येथपर्यंत लोकमान्यानीं राष्ट्राची परिस्थिति आणि ब्रिटिश साम्राज्यनीति यांचा विचार करून निःशस्त्र क्रांतीचा मार्ग हेच स्वराज्यप्राप्तीचे साधन म्हणून निश्चित केलें होतें, हे आम्हीं सांगितले आहेच आता या मार्गांतसुद्धां कायदेमंडळांतील किंवा मंत्रिमंडळांतील कार्यापासून करबंदी व कायदेभंग इत्यादि अनेक साधनांचा समावेश होत असून त्यांचा केव्हा कसा उपयोग करावा यासंबंधी त्यांचे विचार काय होते तें पाहूं.

येथें कायदेमंडळांतील कार्याला ते कितपत महत्त्व देत होते आणि राष्ट्रसभानिष्ठा व

लोकशाहीवर दृढ विश्वास ही त्यांच्या राजकारणातील जशीं नित्य आद्यतत्त्वें म्हणतां येतात, तसें कायदेमंडळात जाणें, हे त्यांच्या राजकारणांतील नित्य तत्त्व होतें की काय, या एका गौण परंतु काही लोकांनी प्रमाणाबाहेर महत्त्व दिलेल्या प्रश्नाचा थोडासा विचार करणें भाग आहे. कायदेमंडळांतील व स्थानिक स्वराज्यातील लोकनियुक्त जागावर बहिष्कार घालण्याची मूळ कल्पना ही म गांधींनीं काढलेली नसून १९०६–१९०७ साली लो टिळक व त्याचा बंगालमधील अनुयायोवर्ग यानींच प्रथम ती काढिली होती लाला लजपतराय याना हद्दपार केले तेव्हां लो टिळकानी या कल्पनेचा उघडपणे पुरस्कार केला आहे मोर्ले-मिंटो-सुधारणा आल्या तरीहि वंगभग रद्द होईपर्यंत आपण कायदेमडळात जाणार नाही, अशी शपथ बाबू सुरेद्रनाथ बानर्जी यांनी घेतली होती, व वंगभंग रद्द झाल्यावरच ते कायदे-मंडळात गेले. राष्ट्रीय पक्षाच्या विचारसरणीवर त्या वेळी ना. गोखले यानी पुढील आक्षेप घेतला आहे ते म्हणतात:—"Finally, there was the boycott of honorary offices, such as seats on local and municipal boards and on Legislative Councils If the present men resigned, enough men would still be forthcoming to take their places, and those who resigned would soon find that they had only thrown away such opportunities as could be had at present of serving the public They must seek steadily to increase what little powers of administration and control they possessed, and they would be injuring and not advancing the interests they had at heart, by the course proposed"

—*Speeches of Gokhale, p 956*

या वेळी म. गाधीचा असहकार किंवा कायदेमंडळ-बहिष्कार लोकापुढें नसून टिळक-पक्षाचा बहिष्कारयोग पुढे होता त्यावर "तुम्ही कायदेमंडळांत गेला नाहीं तर दुसरे जातील व तुम्हांला आज जे थोडे लोकहित करतां येतें तेंहि करतां येणार नाहीं. म्हणून जी थोडी सत्ता आपल्या हातीं आहे, ती हातांत घेऊनच तिची वाढ केली पाहिजे; तिच्यावर बहिष्कार घालू नये," असा आक्षेप गोखले यांनी टिळक-पक्षावर घेतला होता. हाच आक्षेप श्री केळकर हे गेली सतरा वर्षे राष्ट्रसभेवर घेत आले

आहेत परंतु गोखले किंवा केळकर यांचा हा आक्षेप सर्व काळ किंवा सर्व परिस्थितीत लागू पडत नाही, असें लो. टिळक व म. गांधी यांचें मत आहे. कित्येक वेळां मोठ्या स्वराज्याच्या लक्ष्यासाठी छोटें स्वराज्य सोडूनहि द्यावें लागतें व अधिक हक्क मिळविण्यासाठी अथवा स्वाभिमानरक्षणासाठी थोडया मिळालेल्या अधिकारावर बहिष्कारहि घालावा लागतो लो टिळकांची किंवा म. गांधीची मोठ्या स्वराज्यासाठी छोट्या स्वराज्यावर बहिष्कार घालण्याची ही वृत्ति श्री केळकर यांना कधीच पटली नाहीं त्यांना ना गोखले यांचाच पंथ प्रथमपासून आवडत असे. मात्र लो. टिळक मंडालेस जिवत होते तोपर्यंत ते या वृत्तीची उघड चेष्टा करूं शकत नसत त्या वेळी या वृत्तीसबंधी लिहितांना ते फार जपून लिहीत व ही गोष्ट असामान्य राष्ट्भक्तांस शोभली तरी सामान्य लोकांना ती शोभत नाहीं, असें ते सांगत. १९१२ सालच्या एका लेखात ते म्हणतातः—

"मोठ्या स्वराज्याकरितां जन्म खर्ची घालणाऱ्यांनी स्थानिक स्वराज्याकडे पाहून नाक मुरडावे, तें त्यांना शोभेल...मॅझिनी, डॉ सन्यत्सेन–ज्यांनीं स्वराज्याच्या वेडात देह किंवा व्यवहार काहींच मानला नाही, अशा लोकांनीं स्थानिक स्वराज्याकडे दुर्लक्ष केल्यास तें त्यांस माफ आहे मोठें स्वराज्य आपणांस आज देत नाहीत ही सरकारची चूक असेल. पण लहान स्वराज्य हातीं असलेले आपण अव्हेरतो ही आपली चूक होय धाकटे स्वराज्य सोडल्यानें मोठें स्वराज्य मिळण्यासारखें असेल, तर धाकटे खचित सोडावें. पण सरकारावर रागावून सोडण्यासारख्या इतर गोष्टी कितीतरी आहेत ! व त्या आपण कितपत सोडतों याचा मात्र मनाशीं प्रथम विचार झाला पाहिजे. बहिष्कार हें एक शस्त्र आहे; कोंडमारा झालेल्या, निराश्रित झालेल्या मनुष्यास व राष्ट्रास बहिष्कार हें शस्त्र पुष्कळ वेळां चांगलेंच उपयोगी पडतें व त्याचा उपयोग करावाहि. पण बहिष्कार-शस्त्राचाहि तीन त्रिकाळ, अष्टौ प्रहर व बारा मास उपयोग करून चालेल कीं काय हाहि एक प्रश्नच आहे."

—केळकरकृत लेखसंग्रह, भाग ४, पृ. १३२-३३

या वेळी वंगभंगांतून निघालेला बहिष्कारयोग मरूं लागला होता. परंतु त्याची ज्योत कांहींच्या अंतःकरणांत तेवत होती ती विझवून टाकण्याचा हा प्रयत्न आहे. तथापि लोकनियुक्त जागांवरील बहिष्कार हें अगदींच वेडेंपण

आहे, असें म्हणणे टिळकांच्या हयातींत कठिण होतें. तेव्हां हे वेड मॅझिनी, सन्यत्सेन यांच्यासारख्याना शोभतें, शिवाय बहिष्कार-शस्त्राचाहि तिन्ही त्रिकाळ उपयोग करूं नये इत्यादि सौम्य शब्दात या वृत्तीवर त्यानी टीका केली आहे कारण, त्या वेळीं लो टिळक जिवत होते व ते परत आल्यावर पुन. कोणतें वेड काडतील त्याची निश्चिती नव्हती ! त्यांनी तें वेड काढलें, तरी त्यांची गणना मॅझिनी, सन्यत्सेन यांसारख्या असामान्य विभूतीत करण्याची पळवाट या युक्तिवादांत ठेविली आहे. अर्थात् लोकामान्याच्या निधनानंतर या पळवाटेचीहि गरज उरली नाही, आणि म. गांधीनी बहिष्कारयोगाचे पुनरुज्जीवन केलें, तेव्हां त्यांना मॅझिनी, सन्यत्सेन यांच्या कोटीतील लोकांची सवलत देण्याचेंहि कारण उरलें नाही ! कारण कीं, अमृतसरला लो टिळकांनीच कौन्सिल-प्रवेशाचा कार्यक्रम आंखला होता. आता तर लो टिळकाच्या नांवानेंच कौन्सिल बहिष्कारावर हल्ला चढविण्याची सोय झाली आणि याच बहिष्कारावर गोखल्यानीं घेतलेले आक्षेप हीच लो टिळकाच्या व्यवहार्य राजकारणाची त्रिकालाबाधित तत्त्वे ठरून गेली ! कारण, मडालेहून जसे टिळक परत आले तसे ते आतां परत येण्याची मुळीच भीति उरली नव्हती ! अमृतसरचा ठराव हाच टिळकाच्या चाळीस वर्षांच्या राजकारणाचा निष्कर्ष व अमृतसर हेंच त्याच्या पक्षाचें—' टर्मिनस् स्टेशन '—शेवटचें विरामस्थान झाले ! आतां त्या राजकारणांत वाढ किंवा रूपान्तर अथवा प्रगति होण्याचा सभवच नव्हता. वंगभंग आणि त्यानंतरच्या दडपशाहीमुळे कायदेमंडळावर बहिष्कार घालण्याचे वेड लो. टिळकांच्या डोक्यांत शिरलें असले, तरी तें असामान्य विभूतीला शोभण्यासारखें होतें, पण जालियनवाला बागेतील कत्तलीच्या चौकशीत न्याय मिळाला नाही म्हणून तेंच वेड म. गांधीच्या कार्यक्रमात शिरलें, तर त्याची गय करण्याची आवश्यकता उरली नाहीं परंतु कॉंग्रेस-डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्यांतील राष्ट्रसभानिष्ठेचा पायबंद अद्यापि तुटला नव्हता. १९२० साली लोकमान्याची स्मृति ताजी असतांना राष्ट्रसभेच्या आज्ञेविरुद्ध बंड करणे हेंच लोकमान्याचे राजकारण, असे सांगण्याची व तें लोकांना पटविण्याची शक्यता नव्हती यामुळें १९२० सालच्या निवडणुकीवर " कॉंग्रेस डेमोक्रॅटिक " ( राष्ट्रसभानिष्ठ लोकशाही ) पक्षाने बहिष्कार घातला. यावेळीं तरी कायदेमंडळ-प्रवेश हेंच टिळकांचें त्रिकालाबाधित तत्त्व व त्यासाठी राष्ट्रसभेविरुद्ध बंड करणें हेंच खरें राजकारण, हें मत कोणाला पटलें नाही. पुढें राष्ट्रसभेंत स्वराज्यपक्ष

निघाला आणि त्यानें १९३० सालापर्यंत कायदेमंडळांतील कार्य केलें. पण दे. बं. दास व पं. मोतीलाल नेहरू यांचें मंत्रिपद-बहिष्काराचें धोरण श्री केळकर यांना झेपेना म्हणून त्यांनीं मंत्रिपदस्वीकाराच्या तत्त्वाचें प्रतिपादन करण्यास आरंभ केला. पण याला कॉंग्रेस-डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्यांत स्पष्ट आधार कोंठेच नाहीं. लोकमान्यांनी मॉटफोर्ड-सुधारणांसंबंधीं आपले धोरण पुढीलप्रमाणे मांडलें आहे :—

"राष्ट्रीय सभा हातात पडलेल्याचा उपयोग करा म्हणून सांगत आहे, पण जे हातांत पडले आहे तें समाधानकारक नसून निराशाजनक असल्यामुळें पार्लमेंटसभेकडून पूर्ण स्वराज्याचे हक्क मिळेपर्यंत चळवळ करा, अशी दिशा राष्ट्रीय सभेनें दाखविली आहे या दिशेनें जात असतांना सर्व हिंदी राष्ट्राचे कल्याण व्हावें म्हणून आणि सर्व गोरगरिबाची उन्नति व्हावी म्हणून नोकरशाहीशीं काही वेळा सहकारितेनें तर कांही वेळा बिनसहकारितेनें वागावे लागेल **राष्ट्रीय सभेच्या या सहकारितेच्या व बिनसहकारितेच्या दोन्ही मार्गांनीं प्रसंगानुसार जाणारे तेच राष्ट्रीय सभेचे खरे भक्त होत**"

—लो. टि के. ले भा ३, पृ ८६२

यांत आपण नित्य सहकारितेनेंच वागूं, असहकारितेने कधीहि वागणार नाही, असे कोठेहि म्हटलेले नाही. इतकेच नाही, तर पुढे "**नवी विटी नवें राज्य**" या आपल्या शेवटच्या लेखांत ते म्हणतात, "गोडीगुलाबीने वागून नव्हे, तर कायदेशीर रीतीने भांडून शक्य तितक्या लवकर त्यांजवर कुरघोडी कर्तव्य आहे; ...कोणी म्हणतील की, अशा रीतीने तुम्ही वागल्यास हल्लीच्या कायद्याची धूळधाण करण्याचे पाप तुम्ही आपल्या कपाळीं घ्याल पण या मूर्खांस असे कळत नाही कीं, या कायद्यांतून जर पूर्ण स्वराज्याचा कायदा पुढे उत्पन्न करावयाचा आहे, तर याचें आयुष्य जितक्या लवकर सपेल तितके आम्हांस इष्टच आहे. ज्याला पतंग व्हावयाचे आहे, तो फार दिवस सुरवंटाच्या स्थितीत कसा राहील?"

—उक्त ग्रंथ, पृ. ४७७

तात्पर्य, मॉटफोर्ड-सुधारणा नांदवून घेऊन नव्हे, तर त्यांची धूळधाण करूनच आपणांस स्वराज्याची घटना प्राप्त होईल व त्यासाठीं आपणास साम्राज्य-सरकारवर कुरघोडी करावयाची असल्यानें कधीं सहकारितेने तर कधी बिनसहकारितेनें

वागावे लागेल, असें लोकमान्यांचे या वेळचें धोरण होतें हें स्पष्ट आहे पण ही सहकारिता किंवा विनसहकारिता केव्हां, कोठें व कशी आचरावयची, याचा निर्णय राष्ट्रीय सभेनेंच दिला पाहिजे आणि तो सर्वांनीं निमूटपणे पाळलाच पाहिजे. सहकारिता किंवा असहकारिता हें नित्य धोरण कोणाच्याच राजकारणाचें होऊं शकत नाहीं. हें धोरण प्रसंगानुसार बदलावे लागतें. अमृतसरचा ठराव हाच लोकमान्यांच्या राजकारणाचा त्रिकालाबाधित सिद्धान्त नव्हे, किंवा असहकारिता हेंच म. गांधीचे आधारभूत राजकीय तत्त्व नव्हे. अमृतसर येथे म. गांधीसुद्धां 'दिले आहे त्याचा उपयोग करून घ्यावा,' असेच लोकमान्यांप्रमाणें म्हणत होते; आणि तेच म गांधी हंटरकमिटीचे इतिवृत्त वाचल्यानंतर असहकारवादी झाले लो टिळकदेखील वगभगानंतर कौन्सिल-बहिष्कार बोलत होते, तर अमृत-सरास कौन्सिल-प्रवेश बोलू लागले. तसेच आज राष्ट्रसभा अधिकारस्वीकारवादी झाली आहे हेहि बरोबरच आहे, असें म गांधी म्हणत आहेत तथापि सन १९२७ साली कौन्सिल-बहिष्कार पुकारण्यांत आपण चूक केली असेहि त्यांना आज मुळीच वाटत नाही प्रतिपक्षाशी सहकार केव्हां करावा, असहकार केव्हा करावा, त्याच्याशी शिष्टाई केव्हा करावी, केव्हा करू नये, त्या शिष्टाईत केव्हा कोणत्या मुद्द्यावर हट्ट धरावा व कोणत्या मुद्द्याचा हट्ट केव्हा सोडावा, या गोष्टी कधीच नित्य सिद्धान्ताचें स्वरूप धारण करू शकत नाहीत या बाबतीत राष्ट्रांतील निर-निराळ्या पक्षात व पुढाऱ्यात थोडेफार मतभेदहि होऊ शकतात, पण या सर्व मत-भेदांसंबंधी राष्ट्राच्या प्रतिनिधिसभेचा निर्णय हाच शेवटचा मानावा, हे तत्त्व मात्र लोकमान्यांच्या राजकारणात अथपासून इतिपर्यंत दिसून येतें त्याचप्रमाणें आपणांस गोडीगुलाबीने स्वराज्य मिळणार नाही, केवळ सनदशीर साधनें निरुपयोगी आहेत; साम्राज्यशाहीची अडवणूक केली पाहिजे, या अवडणुकीचा पल्ला कायदेभग व करबंदीपर्यंतहि न्यावा लागेल, पण अत्याचाराचा मार्ग स्वीकारू नये, प्रसंगानुसार सहकरिता व असहकरिता आचरावी, पण राष्ट्रसभेची शक्ति पाठीशी ठेवावी; शिष्टाई केली तरी तिच्याच वतीने करावी, किमान मागणी ठरविली तरी ती तिनेंच ठरवावी आणि कायदेमंडळात गेले तरी तिच्या धोरणाची शिस्त पाळून जावें व वागावें, हें त्यांच्या राजकारणाचें नित्याचें स्वरूप मानतां येईल. आपल्या पक्षांत व नेमस्त पक्षांत साध्य व साधन या दोहोंतहि भेद आहे असें ते मानीत. यांपैकीं साध्याच्या भेदापेक्षां साधनभेदच खरोखर एकत्र नांदण्यास आड येत

आहे, असे त्यांना वाटे **"खरी अडचण कोठें आहे?"** या लेखांत ते लिहितातः—

"गेलीं पंचवीस-तीस वर्षें काम केलेले सर फेरोजशहा मेथासारखे जुने पुढारी सरकारास उघड रीतीनें अडविण्याचा लोकांना उपदेश करण्यास कधीहि तयार नव्हते व नाहीत त्याचा मार्ग अडवणुकीचा नाही, स्वतंत्र पण गोडीगुलाबीचा आहे...स्वराज्य किंवा स्वातंत्र्य या अंतिम साध्याबद्दलचा वाद लांबचा म्हणून क्षणभर बाजूला ठेवतां येईल, पण नेटाची गोडीगुलाबी किंवा हट्टाची अडवणूक या साधनभेदामुळे पदोपदी उत्पन्न होणारी विसंगतता किंवा विरोध कसा टाळावा हेंच काय तें सांप्रत मोठे गूढ आहे"

—उक्त ग्रंथ, पृ २५०

तात्पर्य, व्यावहारिक राजकारणांत साध्यभेदापेक्षां साधनभेद हेच फार नडतात. म्हणून दोन अत्यंत भिन्न साधनांचा उपयोग करणारे पक्ष एका संस्थेत फार काळ नांदू शकत नाहीत. हिंदी राजकारणांत सनदशीर सुधारणावाद, निःशस्त्र क्रांतिवाद व सशस्त्र क्रांतिवाद, असे साधनभेदांतून निर्माण झालेले तीन स्थूल पक्ष आहेत. राष्ट्रसभा प्रथमपासून १९१७ पर्यंत पहिल्या पक्षाच्या हाती होती, ती दुसऱ्या धोरणाने चालावी याबद्दल लोकमान्यानी १९०५ पासून १९१६ पर्यंत कसून प्रयत्न केले शेवटी १९१७ साली ती त्याच्या हाती आली; परंतु आपल्या नि.शस्त्र क्रांतिवादाचा विकास करण्यास त्यांना अवधि मिळाला नाहीं. १९२० साली त्याचे देहावसान झाले व त्याच वेळी म. गांधीनी लोकमान्यांचा संकल्प पूर्ण करण्याचें कार्य आरंभिले. या नि.शस्त्र क्रांतिमार्गातील कायद्याच्या अंतिम मर्यादे-पर्यंतचा पल्ला लोकमान्यांनी गांठला होता आणि यापुढे कायदेभंगाचा व करबंदीचा खडतर प्रवास राष्ट्राला करावा लागणार आहे, हे त्यांनी ओळखिले होतें. या खडतर मार्गानें राष्ट्रसभेचा रथ म. गांधीनी गेली सतरा-अठरा वर्षें सतत हांकला आहे. आज राष्ट्रसभेनें अधिकारग्रहण करून प्रांतिक स्वराज्य हस्तगत केले आहे, त्याअर्थी राष्ट्रसभेची गाडी फिरून अमृतसरला आली, हें म्हणणे पोरकटपणाचें आहे. कारण अधिकारग्रहण केले म्हणून तिनें किंवा म. गांधीनी नि शस्त्र क्रांतीचा मार्ग सोडून दिला व ती लोकशाही पक्षाप्रमाणें किंवा प्रागतिक पक्षाप्रमाणें सनदशीर कार्यांतच सदैव मग्न राहील, असें कोणासहि म्हणतां येणार नाही. आज सनदशीर कार्यावर

नर देणारे म. गांधीच योग्य प्रसंगी पुनः सार्वत्रिक सत्याग्रह-सग्राम करण्यास पुढें येतील, असें राष्ट्रसभेंतील अनेक पुढाऱ्यांचें मत आहे. यासबधी बाबू सुभाषचंद्र बोस ऑगस्ट महिन्याच्या ' मॉडर्न रिव्ह्यू ' मध्यें म्हणतात:—

" Above all, the fact that Mahatma Gandhi, in spite of his temporary retirement is as vigilant as ever, watching events with the closest interest, will convince every one that should the occasion arise, as in all probability it may,-he will not hesitate to come out into the open once again and calling upon the Congress to discard constitutional activity, will unfurl the flag of ' mass satyagraha " so that, the Congress may fight its last battle for winning " Purna Swaraj " for India. "

हें महत्कार्य जेव्हां म० गांधी करतील, त्याच वेळी लोकमान्यांचा संकल्प पूर्ण होईल आणि लोकमान्यांचें खरे राजकारण राष्ट्रसभेनेंच चालविले व लोकशाही पक्षाने त्यातील खोबरे टाकून करवटीच कवटाळली आहे, अशी लोकांची खात्री होईल परंतु त्यावेळी कदाचित् लोकशाही पक्ष स्मृतिशेषहि उरणार नाही !

लोकशिक्षण :<br>
ऑगस्ट, १९२७

# लो० टिळकांचें विवेकी राजकारण
## आणि
# बॅ० सावरकरांची अविवेकी हुल्लड : : ४

" सहसा विदधीत न क्रियामविवेक· परमापदा पदम् ।
वृणुते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धा· स्वयमेव सपदः ॥ "

—भारवि

" हिंदुस्थान ही आमची जन्मभूमि देवता, हिंदुस्थानवासी हेच आम्हां सर्वांचे बंधुत्वाचें नातें, आणि वस्तुस्थिति लक्षात आणून आमची राजकीय व सामाजिक स्थिति सुधारण्याचा एकनिष्ठपणानें व स्वार्थाकडे लक्ष न देता सतत परिश्रम करणे हाच आमचा धर्म, हे दादाभाईच्या चरित्रावरून पूर्णपणें व्यक्त होत आहे, व त्यास हल्लीं जो सन्मान मिळत आहे, त्यावरून या नूतन राजधर्माचा हिंदुस्थानभर लवकरच प्रसार होईल अशी आमची खात्री आहे "

–लो टिळक ( केसरी, १८९४ )

" My contention is, therefore, that we must create our own organization and must win Swarajya through the Hindu Mahasabha, which alone can represent the Hindu Nation, Hindutva is nationalism, and as such it is the

Hindu Mahasabha which must strive for the attainment of Swarajya for the Hindu Nation "

—V. D. Savarkar
The Mahratta, Aug. 4, 1939

" कॉंग्रेसच्या डेमोक्रॅटिक पक्षाचे धोरण त्याच्या नांवावरूनच व्यक्त होत असून कॉंग्रेसविषयी अढळ निष्ठा आणि डेमॉक्रसी ( लोकशाही ) वर दृढ विश्वास, हे त्यांतील बीज आहे. "

—कॉंग्रेसमधील लोकशाही पक्षाचे धोरण
केसरी, २० एप्रिल १९२०

## लोकमान्यांचें पुण्यस्मरण

हिंदुस्थानसारख्या पस्तीस-चाळीस कोटी लोकांच्या खंडतुल्य देशांत एकत्वाची प्राणप्रतिष्ठा करणें, हिंदू व मुसलमान यांसारख्या हिंदुस्थानवर अनेक शतकें सार्वभौमत्व गाजवून त्यासाठी परस्परांशी लढणाऱ्या भिन्नधर्मीय लोकांचे ऐक्य साधणे, आधुनिक भौतिक शास्त्रें आणि अद्ययावत् शस्त्रबल व युद्धकला यात अत्यंत पुढारलेल्या व राजनीतिनिपुण अशा अभूतपूर्व साम्राज्यसत्तेशी लढा देण्यास अज्ञान, अशस्त्र, असंघटित व अकर्मप्रवण अशा जित जनतेला प्रवृत्त करणें, आणि सर्वस्वी विषम असा हा स्वातन्त्र्यसंग्राम आजन्म चालविल्यानंतर तो अखंडितपणें पुढील पिढीनें कसा चालवावा याचे स्पष्ट दिग्दर्शन करून आपला देह इहलोकी ठेऊन अमरलोकांत प्रवेश करणें, या गोष्टी असामान्य विभूतीविना कोणाच्याहि हातून घडण्यासारख्या नसतात अशा लोकोत्तर राष्ट्रपुरुषात लो टिळकांची अग्रभागी गणना होत असते. राष्ट्र-पितामह दादाभाई नौरोजी, लो. टिळक आणि म. गांधी ·या तीन श्रेष्ठ विभूतीच्या तपश्चर्येचे मूर्त फल आधुनिक भारत हे आहे, असें म्हटल्यास यत्किंचित् अतिशयोक्ति होणार नाही दादाभाई, टिळक किंवा गांधी यांच्या काळात त्यांना साहाय्य करणारे, त्यांच्या कार्यास पूरक असें इतर कार्य करणारे अथवा प्रसंगी त्यांना प्रामाणिकपणे विरोध करून त्यांच्या कर्तृत्वाचे चित्र अधिक उठावदार करणारे अनेक लोकनायक या राष्ट्रांत झाले नाहीत असें नाहीं, किंवा त्यांच्या कार्याविना हे राष्ट्रनिर्मितीचें कार्य इतकें सुंदर घडविलें

गेले असतें असेंहि आम्हांस म्हणावयाचें नाहीं. आमच्या म्हणण्याचा मथितार्थ इतकाच कीं, दादाभाईना वगळल्यास आधुनिक भारताचे पितामहत्व त्यांच्या पिढीपैकी इतर कोणासहि प्राप्त झालें नसतें; टिळकांना वगळल्यास आधुनिक भारतनिर्मात्यांची दुसरी पिढी असून नसल्यासारखीच झाली असती, आणि गांधी पुढे आले नसते, तर दादाभाईचें व टिळकांचें जीवितकार्य नामशेषच झाले असतें, किंबहुना, त्यांचें नांवहि आज राहिलें नसतें.

तथापि, हें लिहिणेंहि एकप्रकारे अशास्त्रीयच ठरेल. कारण, दादाभाईसारख्या नररत्नाला ज्या भारतमातेनें जन्म दिला तिच्या उदरीं लोकमान्यांसारखा नरवीर जन्मास येण्याचा असंभव कां कल्पावा? आणि दादाभाई व टिळक यांना लागोपाठ प्रसवणारी राष्ट्रदेवता त्यांच्यानंतर गांधींसारख्या जगद्वंद्य विभूतीला जन्म देणार नाही असा चमत्कार घडण्याचा संभव तरी कां मानावा? लोकमान्यांसारखा राष्ट्रपुरुष पुढील पिढींत निपजूं नये इतकें दादाभाईचे पुण्य क्षुद्र नव्हतें, आणि गांधींच्यासारखा महात्मा अपुरे राहिलेलें कार्य करण्यास पुढें सरसावूं नये इतकी लोकमान्यांची तपश्चर्या वंध्या नव्हती. लो. टिळकांचेच अनुयायी म्हणवून घेणारे कांहीं लोक मानितात त्याप्रमाणे लोकमान्यांच्या राजकारणाचे त्यांच्या देहाबरोबरच राष्ट्रानें विसर्जन केलें असतें, तर लोकमान्यांचें लोकोत्तरत्व भावी इतिहासकारास सिद्ध करतां आलें असतें काय? निदान आम्हांस तरी ही विचारसरणी अशास्त्रीय व लोकमान्यांच्या कर्तृत्वास कमीपणा आणणारी वाटते. आमचें याउलट असें स्पष्ट मत आहे कीं, लो. टिळकांच्या राजकारणाचें व राष्ट्रकारणाचें सूत्रच म. गांधीनीं पुढें चालविले आहे, आणि म. गांधींना विरोध करून लोकमान्यांच्या राजकारणाची परंपरा चालविण्याचे नाटक आज जे करीत आहेत ते लोकमान्यांना कमीपणा आणून आपलें जगाकडून हसें करून घेत आहेत; किंबहुना, यापुढे याहूनहि अधिक प्रमाणांत करून घेणार आहेत.

## महाराष्ट्रांतील नवा राजकीय प्रयोग

म. गांधींच्या तत्त्वज्ञानास अथवा व्यक्तिमत्त्वास विरोध, एवढ्या एकाच समान भूमिकेशिवाय श्री. तात्यासाहेब केळकर व बॅ. तात्याराव सावरकर यांच्या मतांत, वृत्तींत, धोरणांत, प्रकृतींत अथवा पूर्वेतिहासांत कोणतेंहि साधर्म्य नाहीं. श्री. केळकर हे आजन्म लोकमान्यांच्या सेवेंत असले आणि

त्यांच्या निधनानतरहि त्यांचेच राजकीय धोरण आपण प्रतिपादीत आहोंत अशी त्यांनीं बतावणी केली असली, तरी आपण लोकमान्यांचे शिष्य नाहीं आणि त्यांचा व आपला मतभेद आदीपासून अंतापर्यंत अविच्छिन्न होता ही गोष्ट त्यानी आपल्या आत्मचरित्ररूप 'गतगोष्टी' मध्यें निःसंदिग्ध रीत्या विशद केली आहे. बॅ सावरकर हे लोकमान्यांच्या हयातींत टिळकसंप्रदायांत मोडत नव्हते, ही गोष्टहि जगजाहीर असून श्री. केळकरकृत टिळकचरित्रांतहि ती नमूद आहे. लोकमान्यांच्या हयातीत महाराष्ट्रांत गोखले-टिळक-सावरकर असे तीन परस्परांहून भिन्न राजकीय संप्रदाय होतेः (१) सनदशीर राजकारण, (२) निःशस्त्र क्रांतिवाद, आणि (३) सशस्त्र क्रांतिवाद, अशा शब्दांनीं या तीन संप्रदायांतील अंतर व्यक्त करता येईल आजहि असे तीन राजकीय पंथ आपल्या राष्ट्रांत आहेत परंतु त्यापैकीं पहिला व तिसरा राष्ट्रसभेच्या बाहेर असून राष्ट्रसभेंतील सर्व पक्षोपपक्ष निःशस्त्रक्रांतिवादी आहेत. आजची राष्ट्रसभा संपूर्णतः निःशस्त्रक्रांतिवादी आहे; पण लोकमान्यांचें सर्व सार्वजनिक आयुष्य तिला केवळ सनदशीर मार्गावरून नि.शस्त्र क्रातिमार्गावर आणण्यांत खर्ची झालें आणि आपल्या आयुष्याच्या शेवटी त्यांनी हें उद्दिष्ट तडीस नेले. लोकमान्यांच्या निधनानंतरच्या एकोणीस वर्षांत राष्ट्रसभेच्या धोरणाचा कितीहि विकास झाला असला, तरी स्थूलतः सनदशीर राजकारण व सशस्त्र क्रांतिवाद या दोन चाकोऱ्या वगळून तें निःशस्त्र क्रांतिवादाच्या मध्यवर्ति मार्गानेंच चालू आहे; आणि स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, व स्वराज्य या राष्ट्रीय पक्षाच्या चतुःसूत्रीचाच विकास अनेक रूपांनीं राष्ट्रसभा आज करीत आहे, असें सर्वांस मान्य करावें लागेल. स्वदेशी चळवळीला आज खादीच्या व ग्रामोद्योगाच्या शुद्ध स्वदेशी चळवळीचें स्वरूप प्राप्त झालें आहे, राष्ट्रीय शिक्षणाची परिणति वर्धा-शिक्षणांत झाली आहे, बहिष्काराचा विकास होतां होतां त्यांत कायदेभंग व करबंदीपर्यंतच्या टिळकसूचित सर्व लढाऊ कार्यक्रमांचा अंतर्भाव झाला आहे, आणि स्वराज्याच्या चळवळीचें आजचे स्वरूप घटनापरिषद्, स्वयंनिर्णय व संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य असें बनलें आहे. इतकेंच नव्हे, तर जी मद्यपानबंदीची अत्यंत प्रभावी चळवळ करून लोकमान्यांनीं प्रांतिक सरकारचा राज्यकारभार बंद पाडण्याचा महान् व्यूह रचिला होता, त्याच मद्यबंदीच्या नैतिक कार्यक्रमाच्या हत्यारानें आपलें प्रचलित राज्यघटनाभंगाचें राजकारण आजची

राष्ट्रसभा यशस्वी करू पहात आहे! सारांश, राष्ट्रसभेची गाडी सनदशीर मार्गाच्या चाकोरीतून बाहेर काढून तिला राष्ट्रीय पक्षाच्या निःशस्त्र क्रांतिकारक मार्गावर आणून सोडण्यासाठी आपले सर्व जीवित वेचणाऱ्या लोकमान्यांच्या अचूक, प्रभावी व चिरंतन नेतृत्वाचा निश्चित पुरावा याहून अधिक कोणता देतां येण्यासारखा आहे? ज्या दिव्य दृष्टीच्या राष्ट्रपुरुषानें दाखवून दिलेल्या मार्गानें त्याच्या मृत्यु-नंतरहि वीस वर्षेपर्यंत त्याचे राष्ट्र चालले, आणि यापुढेंहि निदान तितकाच काळ त्याहून भिन्न मार्गाचे अवलंबन तें करील असा संभव दिसत नाही, त्याला 'राष्ट्रपुरुष' अथवा 'राष्ट्रनिर्माता' ही पदवी प्राप्त झाली तर त्यांत नवल तें काय?

आता क्षणभर लोकमान्यांच्या हयातींतील दुसऱ्या दोन राजकीय सप्रदायांची याच काळांत काय स्थिति झाली आहे, तिकडे दृष्टिक्षेप केल्यास आपणांस काय दिसून येतें? प्रागतिकांच्या सनदशीर राजकारणाची आज काय स्थिति झालेली आहे? आजच्या राष्ट्रीय जीवनावर या सप्रदायाचा प्रभाव कितीसा उरलेला आहे? या प्रश्नांची उत्तरे न देताहि वाचकांस समजणारी आहेत. बरे, बॅ. सावरकरांच्या सशस्त्र क्रांतिकारक राजकारणाची तरी आज काय अवस्था आहे? अर्थात् लोकमान्य आज हयात असते, तर त्यांनी कोणतें राजकारण केले असतें असा प्रश्न ज्यांच्या मनांत उद्भवत असेल, त्यांनीं आपणांस पुढील तीन प्रश्न विचारावेत आणि त्यांची उत्तरे आपणच द्यावीतः (१) लोकमान्य आज प्रागतिकांच्या निष्प्रभ ठरलेल्या सनदशीर राजकीय संप्रदायांत झळकले असते काय? (२) स्वतः सावरकर आपले सशस्त्र क्रांतीचें राजकारण सोडून निःशस्त्र प्रतिकाराचें राजकारण—मग त्याला 'सत्याग्रह' हे नांव ते न देवोत—करीत असतां, त्यांचा संप्रदाय चालवून हिंदभू स्वतंत्र करण्याच्या प्रयत्नांची धुरा त्यांनी आपल्या खांद्यावर घेतली असती काय? (३) हे दोनहि मार्ग सोडल्यानंतर निःशस्त्रक्रांतीचा मार्गच काय तो शिल्लक राहतो; हा मार्ग राष्ट्रसभेनें अनुसरावा म्हणून अपल्या जिवाचे रान करणारे लोकमान्य, आज तिचे नेतृत्व करण्यास म. गांधी पुढें आले म्हणून तिच्यावर बहिष्कार घालून, हिंदु-संघटन करण्याच्या मिषानें साम्राज्यसत्तेशीं लढण्याऐवजीं मुसलमानांशीं झगडण्यांत गुंतले असते काय? हे प्रश्न एकाद्या शाळेंतील विद्यार्थ्याच्या परीक्षेला घातले, तरी या तीनहि प्रश्नांचीं नकारार्थी उत्तरे निदान शेंकडा ऐंशी विद्यार्थी देतील अशी आमची

खात्री आहे, आणि जीं शेंकडा वीस मुले तिसऱ्या प्रश्नाचें होकारार्थी उत्तर देतील, तीं सांप्रत राष्ट्रीय स्वयंसेवक-संघांत आहेत असे समजण्यास प्रायः प्रत्यवाय नाहीं !

आतां यावर कोणी असें म्हणेल की, लो० टिळकांनी आपल्या हयातींत सनदशीर राजकारणाच्या चाकोरीतून निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर राष्ट्राचा गाडा आणण्याचा प्रयत्न केला हे आम्हांला मान्य आहे; तसेंच ते आणखी वीस वर्षे वांचते तरी ते सशस्त्र क्रांतीच्या किंवा सनदशीर राजकारणाच्या मार्गावर गेले नसते हेंहि आम्हांस मान्य आहे; परंतु लोकमान्यांना सनदशीर राजकारणापासून सशस्त्र क्रांतीपर्यंतचे सर्वच मार्ग तत्त्वतः मान्य असल्यामुळें आणखी वीस वर्षांनी त्यानी काय केले असतें, हे कोणासहि सांगता येणार नाही; किंबहुना, ते अगदीं भिन्न परिस्थितीत—उदाहरणार्थ, शिवाजीमहा-राजाच्या काळांत—जन्मास आले असते, तर निश्चितपणे सशस्त्र क्रांतिकारकच झाले असते या म्हणण्यावर आमचा असा प्रश्न आहे की, रानडे किंवा गोखले हेहि शिवकालीन परिस्थितीत जन्मास आले असते, तर त्यांनींसुद्धां सनदशीर राजकारणच केलें असतें असे आपण कां समजतां? किंबहुना, म गांधीहि त्या परिस्थितीत रामदासस्वामी किंवा तुकाराममहाराज यांच्याप्रमाणें राजधर्मातील हिंसा करणाऱ्या शिवाजीमहाराजांच्या आड आले नसते असें म्हटल्यास तें कोणत्या आधारें आपण खोडू शकाल? वस्तुतः व्यावहारिक राजकारणाचा विचार करीत असता आपल्या सार्वजनिक जीवनाची अपेक्षित मर्यादा व तिच्यापुढील फार तर एक पिढीची आयुर्मर्यादा एवढ्याच काळाचा विचार मुत्सद्द्यांनी व राष्ट्रीय पुढाऱ्यांनी करावयाचा असतो. अनत काळ टिकणाऱ्या सनातन नीति-तत्त्वांचा विचार हा व्यावहारिक राजकारणांतील प्रश्न नसून त्याचा व्यावहारिक राजकारणाशी संबंध असला, तरी तो मुख्यत्वे ब्रह्मज्ञानाचा विषय आहे· ब्रह्मज्ञान व नीतिशास्त्र या दृष्टीनेंहि लो. टिळक व आजचे राष्ट्रनेते म. गांधी यांच्यांत जमीन-अस्मानाचे अंतर आहे हें काहीचें मत आम्हांस मान्य नाहीं, पण या ब्रह्मज्ञानाच्या अतिभौतिक विषयांत शिरण्याचे हें स्थळ नव्हे.

येथे एवढेच दाखवावयाचें आहे कीं, आज बॅ. तात्याराव सावरकर हे आपल्या सशस्त्र क्रांतीच्या अविवेकी–म्हणजे परिस्थितिसापेक्षदृष्ट्या अविवेकी–मार्गावरून निःशस्त्र प्रतिकाराच्या व्यवहार्य मार्गावर आले असले, आणि

त्यापुरते ते लोकमान्यांचे अनुयायी बनले असले, तरी हिंदुमहासभेच्या अधिष्ठानावर हिंदु राष्ट्राची उभारणी करण्याचे जें धोरण त्यांनीं स्वीकारिलें आहे तें पूर्वीइतकेंच अविवेकाचें असून, त्यांतून माथेफिरू वृत्ति व माथेफोड याहून कोणतीहि राष्ट्रकल्याणकारक गोष्ट निष्पन्न होणें शक्य नाहीं. तसेंच **ही सर्वच कल्पना लोकमान्यांच्या राजकीय विचारांशीं, तत्त्वांशीं व धोरणांशीं मूलतःच विरोधी आहे.** या लेखाच्या शिरोभागीं जीं तीन अवतरणें दिलीं आहेत, त्यांपैकीं पहिलें व तिसरें हीं लोकमान्यांचीं असून तीं त्यांच्या सार्वजनिक जीवनाच्या अनुक्रमें प्रारंभीं व अंतीं लिहिलेलीं आहेत. पहिले इ. स १८९४ मधील राष्ट्रसभेच्या वेळचे असून तिसरे त्यांनीं आपल्या अंतकाळीं स्थापन केलेल्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहिरनाम्यांतील जणुं ब्रीदवाक्यच आहे. या दोनहि अवतरणांत **हिंदी राष्ट्रीय भावना व हिंदी राष्ट्रसभा हेंच आपल्या राजकारणाचें अधिष्ठान आहे आणि तोच आजचा राष्ट्रधर्म आहे,** असें त्यांनीं स्पष्ट शब्दांत नमूद केलेले आहे. हिंदुराष्ट्र व हिंदुमहासभा यांच्या द्वारें स्वराज्याचा लढा चालविण्याचा सावरकरांचा विचार त्यांच्या व्याख्यानाचा 'मराठा' पत्रांत जो अधिकृत वृत्तान्त आला आहे त्यांतून उद्धृत करून लोकमान्यांच्या दोन अवतरणांमध्यें तो दिला आहे. या दोहोंपैकी कोणत्याहि अवतरणांतील विचारांशीं तो तोलून पाहिल्यास लोकमान्यांच्या राजकारणाच्या कसोटीवर तो अविचारच ठरतो, आणि म्हणून **बॅ. सावरकर महाराष्ट्रांत आज जें राजकारण रचीत आहेत, तें तत्त्वतः व मूलतःच लोकमान्यांच्या राजकीय परंपरेहून भिन्न** आहे, एवढेंच आम्हांस दाखवावयाचें आहे. हा एक आधुनिक भारतीय राजकारणांतील नवा प्रयोग आहे, आणि तो लोकमान्यांच्या हयातींत सावरकरांनीं केलेल्या दुसऱ्या राजकीय प्रयोगाहूनहि हीन, अविवेकी, व कांहीं प्रामाणिक तरुणांच्या जीवितांचा नाश करणारा ठरणार आहे, असें आमचें प्रांजल व स्पष्ट मत आहे. एवढा इशारा देऊन लोकमान्यांच्या राजकीय कार्याच्या व तत्त्वाच्या विवेचनाकडे पुनः वळूं.

## भारतीय राष्ट्रवादाचे जनक

लो. टिळकांच्या कार्याचें महत्त्व यथार्थतेने वर्णन करावयाचे झाल्यास त्यांना 'भारतीय राष्ट्रवादाचे जनक' (Father of Indian Nationalism) असें नांव द्यावें लागेल, अशी आमची कल्पना आहे. या राष्ट्रवादाचीं

आर्थिक व राजकीय बीजें दादाभाईच्या विचारसरणींत आढळत असलीं, तरी राष्ट्रवादाची सांस्कृतिक भूमिका तयार करून त्या भूमिकेवर कार्य करणारा एक राजकीय विचारसंप्रदाय व पक्ष निर्माण करण्याचे श्रेय भारतीय नेत्यांपैकीं लो. टिळकांच्याच पदरांत पडूं शकतें. भारतीय प्रागतिक राजकारणाचा जन्म व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतून झाला असून प्रस्तुत व्यक्तिवादाला आरंभ राजा राममोहन रॉय यांच्या कार्याने बंगालमध्यें झाला. व्यक्तिवादी तत्त्वज्ञान हें राष्ट्रीय दृष्टया अंतर्मुख वृत्तीचे असून परकीयांच्या आक्रमणाविरुद्ध चढाई करण्यापेक्षां आपल्या अंतर्गत सुधारणेवर भर देणारे असतें. अर्थात् या तत्त्वज्ञानांत राजकारणापेक्षां समाजकारणाला साहजिक प्राधान्य प्राप्त होतें. राष्ट्रवादी राजकारण हे अधिक बहिर्मुख व परराष्ट्रीय आक्रमणाच्या प्रतिकाराला प्राधान्य देणारें असल्याने त्यात राष्ट्रीय राजकारणाला अग्रस्थान व समाजकारणाला गौणस्थान प्राप्त होतें. भारतीय सार्वजनिक जीवनांत ही विचारक्रांति घडवून आणून हिंदी राजकारणाला परिस्थित्यनुरूप चढाऊ स्वरूप देण्याचें कार्य लो. टिळकांनींच प्रथम करून दाखविले.

हें कार्य करीत असतांनाच टिळकांना आगरकरांशी तीव्र स्वरूपाचें वाग्युद्ध करावे लागलें. आगरकर हे व्यक्तिवादी व बुद्धिवादी होते, तर याच्या उलट टिळक हे राष्ट्रवादी व आत्मवादी होते, हा तात्त्विक मतभेद अद्यापि स्पष्टपणें महाराष्ट्राच्या लक्षांत आलेला नाहीं आपल्याकडे सार्वजनिक मतभेदांमागील तात्त्विक भूमिकांमधील अंतर समजून घेण्याचा परिपाठ अद्यापि पडलेला नसून सार्वजनिक वादविवादांचा विचार आम्ही वैयक्तिक किंवा घरगुती भांडणांच्या व्यक्तिस्वार्थाच्या संकुचित चष्म्यांतूनच पहात असतो. यामुळें सार्वजनिक मतभेद विशद करणारी शास्त्रीय परिभाषाहि आम्ही अद्यापि निश्चित केलेली नाहीं, आणि आमच्या सार्वजनिक विचारांत अनेक घोटाळे अथवा विसंवाद वा आंतरविरोध दिसून येतात यांपैकींच लो. टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांना 'बुद्धिवादी' हें विशेषण लावणाऱ्यांच्या डोक्यांत विचारांचा एक गोंधळ किंवा विसंवाद दिसून येतो. आगरकर व टिळक या दोघांच्या मतभेदाची तात्त्विक भूमिका ज्यांनीं समजून घेतली असेल, ते टिळकांना अथवा त्यांच्या तत्त्वज्ञानाला 'बुद्धिवादी' (rationalist) हें विशेषण कधींहि लावणार नाहीत. त्यांच्या विचारसंप्रदायास ते 'आत्मवादी' अथवा 'बुद्धियोगी' (spiritual or rational mystic) असेंच मानतील.

बुद्धिवादापेक्षां आत्मवाद श्रेष्ठ आहे, तर्कापेक्षां अनुभवाला प्राधान्य आहे, आणि बुद्धीला अगम्य अथवा अगोचर अशा तत्त्वांचे ज्ञान आत्मानुभवानें, आत्मनिष्ठ बुद्धीने अथवा समत्त्वबुद्धिरूप बुद्धियोगाने होऊं शकतें, या सिद्धान्तावर त्यांची दृढ श्रद्धा होती; आणि त्यामुळेंच ब्रह्मज्ञान, नीतिशास्त्र व व्यावहारिक राजकारण या सर्व क्षेत्रांत एक प्रकारच्या विभूतिवादासहि ते महत्त्वाचें स्थान देत असत. सामान्य बुद्धि विषयनिष्ठ, जड व परतंत्र असते, आणि आत्मनिष्ठ बुद्धि स्वतंत्र प्रभावी व प्रतिभाशाली असते यासाठीं राष्ट्रनिर्मितीच्या कार्यात लोकोत्तर घडामोडी करून इतिहासाला नवी कलाटणी देणाऱ्या असामान्य व्यक्तीचें माहात्म्य व विभूतिमत्त्व यांच्याविषयीं सामान्य जनतेंत आदर निर्माण करणे अवश्य आहे असे ते मानीत. सामान्य जनतेच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याचें कार्य केवळ तर्कवश बुद्धिवादानें होणार नसून, तसें करण्यास जनतेची भावशुद्धि करून राष्ट्रीय विचार-क्रांति घडवून आणणाऱ्या असामान्य व्यक्तीसंबंधीं सामान्य जनतेंत जो विभूतिवाद आढळतो त्या विभूतिवादाचाहि उपयोग करून घेतला पाहिजे, असे त्यांचे म्हणणें होतें शुद्ध तत्त्वज्ञान, तात्त्विक नीतिशास्त्र व व्यावहारिक राजकारण या सर्व क्षेत्रांत त्यानी या विभूतिवादाचा आश्रय केलेला आढळतो. शुद्ध तत्त्वज्ञानाच्या अथवा ब्रह्म-ज्ञानाच्या क्षेत्रांत वेद, उपनिषदें, संतवाङ्मय इत्यादि धर्मानुभवी वाङ्मयाच्या अथवा स्वानुभवाच्या आश्रयानेंच ब्रह्मस्वरूपासंबंधीचे निर्णय ठरवावे लागतात, केवळ तर्कबुद्धीनें हा प्रश्न सुटणार नाहीं, असें त्यांचे मत होतें. 'गीतारहस्या-' मधील सर्व तत्त्वज्ञान याच भूमिकेवरून प्रतिपादिलेलें आहे. आध्यात्मिक नीति-शास्त्रांतहि "पुष्कळांचें पुष्कळ हित" किंवा "सर्वभूतहित" कशांत आहे, हें समजण्यास मनुष्याला साम्यबुद्धीची वा योगयुक्त बुद्धीची आवश्यकता असल्यानें नीतिशास्त्रां-तील पेंचप्रसंग सोडविण्यास सामान्य मनुष्यांची तर्कबुद्धि पुरेशी पडत नाहीं, म्हणून अशा सूक्ष्म धर्मनिर्णयार्थ साम्यबुद्धीच्या बुद्धियोग्यास शरण जावे लागतें, असें त्यांनी स्पष्ट म्हटले आहे आणि त्याचें समर्थन पुढील शब्दात केले आहे:—

" कारण, हा सारासारविचार पुष्कळदां इतका सूक्ष्म आणि अनैकांतिक म्हणजे अनेक अनुमानें निष्पन्न करून देणारा असतो की, 'मी तसा दुसरा' ही साम्यबुद्धि पूर्वीच जर मनांत ठसलेली नसेल, तर नुसत्या तार्किक सारासारविचारानें कर्तव्या-कर्तव्याचा नेहमींच बिनचूक निर्णय होणे शक्य नसतें; आणि मग 'मोर नाचतो म्हणून लांडोरहि नाचत्ये' अशांतला प्रकार होण्याचा संभव असतो, असें

आमच्या शास्त्रकारांचें म्हणणे आहे. मिल्लप्रभृति उपयुक्ततावादी पाश्चिमात्य नीतिशास्त्रज्ञांच्या उपपादनांत जो मुख्य अपुरेपणा आहे, तो हाच होय. गरुडानें झांप घालून आपल्या पंजानें मेंढरूं उंच आकाशांत उचलून नेले म्हणून कावळाहि जर तेंच करू लगेल तर फसल्याखेरीज राहणार नाही. यासाठीं साधुपुरुषांच्या नुसत्या बाह्य युक्तीवर अवलबून न रहातां अंतःकरणांत सदैव जागृत असलेल्या साम्यबुद्धीसच शरण गेलें पाहिजे, साम्यबुद्धि हेंच कर्मयोगशास्त्राचें खरें मूळ होय, असे गीता सांगत आहे...साम्यबुद्धि प्रमाण मानिली म्हणजे विशेष अडचणीच्या प्रसंगी धर्माधर्मनिर्णयार्थ ज्ञानवान् साधुपुरुषासच शरण गेलें पाहिजे असें प्राप्त होतें खरें. पण त्यास काही इलाज नाहीं. एकादा मोठा दुर्धर रोग झाला असतां वैद्याच्या मदतीशिवाय त्याचे निदान व चिकित्सा होणे जसें शक्य नसतें, त्याचप्रमाणें धर्माधर्मनिर्णयाच्या बिकट स्थली सत्पुरुषाच्या मदतीखेरीज 'पुष्कळाचें पुष्कळ हित' एवढ्या एकट्याच साधनानें कोणीहि सामान्य मनुष्य आपण स्वतःच धर्माधर्माचा बिनचूक निर्णय करण्याचा अभिमान बाळगील, तर तो व्यर्थ होय"

— गीतारहस्य, पृ. ४०१–०२

अशा प्रकारें ब्रह्मज्ञान व नीतिशास्त्र यांतील विभूतिवादाचें लोकमान्यांनी ग्रहण केलेले तत्त्व थोडक्यांत विशद केल्यानंतर राजकीय घडामोडींतील विभूतिवादासंबंधी त्यांचें काय म्हणणे होतें, तें शिवाजीउत्सवासंबंधी त्यांनी लिहिलेल्या लेखावरून पाहूं. या उत्सवासबंधी ते आपल्या लेखांत म्हणतातः—

"ईश्वरीकृपेची अथवा सहाय्याची कोणत्याहि राष्ट्राचा अभ्युदय होण्यास जरूर आहे, या वाक्याचा खरा अर्थ एवढाच आहे कीं, मनुष्याच्या प्रयत्नाहून त्यास इतर गोष्टींची आवश्यकता लागते, मनुष्यास मुळीच प्रयत्न करावयास नकोत असा त्याचा अर्थ होत नाहीं...राष्ट्राचा अभ्युदय होण्यास रामदास-शिवाजीसारखे पुरुष राष्ट्रांत जन्मले पाहिजेत; म्हणजे पुढें होणाऱ्या थोर पुरुषांनी रामदास-शिवाजीनीं जीं कृत्यें केली तींच केलीं पाहिजेत असें नाही. श्रीशिवाजीमहाराजांनी चंद्रराव मोरे अगर अफझुलखान यांचा वध करविला अगर केला म्हणून पुढें होणाऱ्या थोर पुरुषानें दुसऱ्या एकाद्या हिंदूचा अगर मुसलमानाचा वध केलाच पाहिजे असें नाहीं; व ज्यांनी शिवजयंतीचा उत्सव प्रचारांत आणण्याची खटपट केली त्यांचा असा मनोदयहि नाही...शिवजयंति

करण्याचा उद्देश उद्यां एका 'क्ष'नें उठून मी शिवाजी म्हणून 'ज्ञ'स मारावयास प्रवृत्त व्हावें असा नाहीं. आम्ही पुन्हां असें सांगतों कीं, राष्ट्रांत थोर पुरुष निपजणें हें ईश्वरीकृपेचें लक्षण आहे; व असे थोर पुरुष निपजले म्हणजे त्यांनीं काय केलें पाहिजे हें त्यांस सांगण्यास 'सुधारका'ची किंवा 'केसरी'ची जरुरी नाहीं. थोर पुरुषाचे लक्षणच हें आहे कीं, सभोंवतालची स्थिति पाहून तो आपल्या साधनांची योजना किंवा निवड करीत असतो, व या त्याच्या कामास त्याच्या प्रयत्नाबाहेरील गोष्टींची मदत मिळून त्यास यश आलें म्हणजे त्याचा थोरपणा लोकांस कळून येतो...शिवरायाच्या चरित्राची पारायणें केल्यानें अथवा शिवजयंतीचे पुष्कळ उत्सव केल्यानें कोणी मावळा अगर बी. ए. सुधारक अथवा धर्माभिमानी, शिवाजी अथवा रामदास होऊं शकतो असें नाहीं; पण ज्याप्रमाणें अलेक्झांडरचें चरित्र जूलियस सीझरास प्रोत्साहन मिळण्यास कारण झालें, त्याप्रमाणें श्रीशिवाजीमहाराजांसारख्या थोर पुरुषांच्या उत्सवापासून व चरित्रापासून कालांतरानें ज्या पुरुषांच्या अंगीं नैसर्गिक बुद्धि किंवा ओज असेल त्यांस उमेद येण्याचा संभव आहे. थोर पुरुषांची चरित्रें, पुतळे, जयंत्या ज्या करावयाच्या त्या येवढ्याच-करितां होत; व तात्त्विक दृष्ट्या विचार केला असतां त्यांत ईश्वरीकृपेचें कांहीएक अंग नाहीं असें कधींहि म्हणतां यावयाचें नाही."

— लो. टिळकांचे केसरींतील लेख, भा. १, पृ. ५४६–४७

हा लेख लोकमान्यांनीं १८९६ सालीं लिहिलेला आहे. १८९५ पासून महा-राष्ट्रांत जहाल-मवाळ हे राजकीय भेद पुढें येऊं लागले आणि सामाजिक सुधारणा प्रधान की राजकीय सुधारणा प्रधान, हा विषय मागें पडत चालला. १८९५ पासून १९०५ पर्यंतच्या दहा वर्षांच्या काळांत नेमस्त प्रागतिक राज-कारण आणि जहाल राष्ट्रीय राजकारण यांतील व्यावहारिक भेद भिन्न कार्य-क्रमांच्या रूपानें जनतेपुढें विशद झालेला नव्हता. नेमस्त प्रागतिक राजकारण निष्प्रभ आहे, परिणामशून्य आहे, दुबळें आहे, स्वाभिमानशून्य आहे, अशा प्रकारच्या शब्दांत जुन्या राजकारणासंबंधींचा असंतोष तेवढा विशेष उत्कटत्वानें दिसून येतो; पण राष्ट्रीय पक्षाचें राजकारण भिन्न कार्यक्रमाच्या मूर्त स्वरूपानें अवतीर्ण झालेलें नव्हतें. गणेशोत्सव व शिवाजीउत्सव या रूपांनीं राष्ट्रनिर्मितीच्या कार्यांत धर्मतेज व ऐतिहासिक विभूतींच्या अंगचें ओज निर्माण करण्याचा प्रयत्न चालू होता. दुष्काळ-निवारण व प्लेगांतील रुग्णशुश्रूषा यांच्या योगानें

त्याला विधायक लोकसेवेचें स्वरूप प्राप्त होत होतें, आणि दुष्काळातील व प्लेगांतील अधिकाऱ्यांच्या अरेरावी, बेपर्वाई व जुलमी कारभारावर कडक, निधडया छातीच्या टीकेंतून होणाऱ्या वाक्प्रहारांतून लोकक्षोभाच्या ठिणग्या उडत होत्या. सनदशीर व कायदेशीर राजकारण दुबळें आहे असें प्रत्ययास येत होतें, आणि शिवकालीन सशस्त्र युद्धाच्या साधनांनीं स्वराज्य-संस्थापना करण्याच्या कल्पनेची विफलता शांत विचारांच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांना दिसत होती. अशा वेळीं आपल्या विशिष्ट पद्धतीस अनुरूप अशा स्वराज्य-साधनाचा योग शोधून काढणाऱ्या विभूतीची अथवा अवतारी पुरुषाची आवश्यकता सर्वांना भासत होती. यामुळेंच गणेशोत्सव व शिवाजी उत्सव अशा धार्मिक व ऐतिहासिक उत्सवांतून राष्ट्रतेज निर्माण करण्याचे प्रयत्न लोकमान्य करीत होते. जुनें पटत नाही आणि नवें सुचत नाहीं, अशीच काहीशी या वेळी राष्ट्रीय पक्षाची मानसिक अवस्था होती. अशा अवस्थेत धर्मभावनेचा व विभूतिपूजेचा उपयोग राष्ट्राला व त्याच्या पुढाऱ्यांना होत असतो अशाच मार्गानीं आपल्या परिस्थितीस अनुरूप अशा नव्या साधन-योगाचा शोध राष्ट्रपुरुषांना लागत असतो " **थोर पुरुषांचें लक्षणच हें कीं सभोंवतालची स्थिति पाहून तो आपल्या साधनांची योजना किंवा निवड करीत असतो,**" हे लोकमान्यांचें वाक्य फारच मार्मिक आहे. त्यांत परिस्थितीतूनच आपल्या साधनांचा शोध थोर पुरुषांना लागत असतो, हें मान्य केलेले आहे; पण त्याचबरोबर हा शोध लावण्यास असामान्य व्यक्ती किंवा विभूती लागतात, प्रत्येक सामान्य बुद्धीच्या मनुष्यास असे शोध लागत नाहींत, सामान्य बुद्धि जडपणानें इतिहासांतील विभूतीच्या केवळ बाह्याचरणाचें अंधानुकरण करते, तसें मूर्खपण कोणी करूं नये इत्यादि अनेक महत्त्वाची तत्त्वें वरील लहानशा उताऱ्यांत लोकमान्यांनीं गोविलेलीं आहेत. परिस्थितीच्या निरीक्षणानें निर्माण होणारा बुद्धीचा वास्तववाद आणि विभूतिपूजेनें बुद्धीत निर्माण होणारे आत्मनिष्ठेचें तेज व ध्येयवाद या दोहोंचा समन्वय झाल्यानेंच बुद्धीला साम्यावस्थेचा योग प्राप्त होत असतो, आणि अशा बुद्धियोगानेंच भौतिक किंवा सामाजिक क्षेत्रांतील शोध लागत असतात. लोकमान्यांनीं या लेखांत राजकीय घडामोडीची मीमांसा करीत असतां इतिहासाच्या भौतिक व आध्यात्मिक मीमांसांचा समन्वय (synthesis of material and

spiritual interpretation of history ) साधला आहे असें आमचें मत आहे.

म. गांधीना सत्याग्रहाचा शोध कसा लागला याचे वर्णन करीत असतां, सभोंवारची परिस्थिति व अंतःकरणांतील आत्मबल या दोहोंच्या संघर्षातून त्याचें जनन कसे झालें याचें वर्णन सौ. अवंतिकाबाई गोखलेकृत गांधीजीच्या चरित्राला प्रस्तावना लिहितांना लोकमान्यांनी पुढीलप्रमाणे केलेले आहेः—

" देशांत शांतता राखण्यासाठीं जे कायदे केलेले असतात त्यांत राज्यकर्त्या अंमलदारांशीं दांडगाई करणें अगर त्यांचा हुकूम तोडून बंड करणें ह्या गोष्टी कितीहि सद्बुद्धीनें केलेल्या असल्या, तरी स्वभावतःच बेकायदेशीर मानिल्या जातात अशा वेळीं ज्या देशभक्तास आपली सुधारणा कायदेशीर रीतीनें अमलात आणावयाची असेल, त्याच्या मार्गात अनेक अडचणी उत्पन्न होतात मन जळत असतें. सुधारणा करण्याची उत्कट इच्छा असते कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन करणें गैरशिस्त होय अशी खात्री असते. पण उपाय सुचत नाही. गांधी यांनी स्वीकारिलेला निःशस्त्र प्रतिकाराचा, अडवणुकीचा, किंवा त्यांच्या भाषेंत बोलावयाचें तर सत्याग्रहाचा मार्ग अशा प्रकारच्या अडचणीतच त्यांस सुचलेला असून त्यांनी अनेक अडचणी सोसून त्या मार्गाचा अवलंब केल्यामुळें तो आतां शास्त्रपूत झालेला आहे." यापुढें हा मार्ग अवलंबिण्यास किती बिकट आहे, त्याचा अवलंब करणाऱ्यास उपनिषदांतील आत्मबलाची उपासना करणे कसें अवश्य आहे, आणि तें आत्मबल आपल्या अंगी येण्यासाठी सामान्य लोकांनी म. गांधींसारख्या थोर विभूतीच्या चरित्राचा अभ्यास करणें कां अवश्य आहे, याचें विवेचन लोकमान्यांनीं केले आहे. ते लिहितातः "हा मार्ग सर्व प्रसंगीं, सर्व कालीं, अवलंबिण्यासारखा असला तरी तो हरएक प्रसंगीं उपयोगांत आणावाच किंवा नाही अगर सर्व प्रसंगीं तितकाच फलद्रूप होईल किंवा नाहीं हें निश्चयानें सांगणें कठिण आहे. तथापि, त्या मार्गाची योग्यता मोठी आहे, हें सर्वांस कबूल करावें लागेल...जेव्हां कायद्याने ठरविलेली मर्यादा धर्ममूलक अगर न्यायमूलक नसून केवळ कायद्यांत सांगितलेल्या शासनामुळेंच ती अमलांत यावी असा प्रचलित कायद्याचा परिणाम होऊं लागतो, तेव्हां कायद्यानें दिलेलें शासन भोगून धर्मतत्त्वावरची किंवा न्यायतत्त्वावरची आपली सत्यनिष्ठा कसोटीला लावावी अथवा कृत्रिम कायद्याच्या भीतीनें ईश्वरनिर्मित

न्यायतत्त्वाचा अव्हेर करण्यास प्रवृत्त व्हावे, असा शहाण्यासुरत्या मनुष्याच्या डोळ्यांपुढेंहि एक महत्त्वाचा प्रश्न उभा राहतो. सत्यनिष्ठ आणि न्यायनिष्ठ माणसें कायद्याचा कृत्रिम निर्बंध अशा वेळी पाळणें युक्त नाही असें सांगतात. पण हें सांगणें अमलांत येण्यास सत्यावरील व न्यायावरील निष्ठा इतकी तीव्र असावी लागते, की स्वतःच्या किंवा बायकामुलांच्या सुखासुखाचा व बलाबलाचा विचारहि मनांत न आणतां मनुष्य आपलें कर्तव्य करण्यास झटदिशीं प्रवृत्त होईल. ज्याला मानसिक धैर्य, खरी सत्यनिष्ठा किंवा सात्त्विक शील आणि दानत म्हणतात तें हेच होय. हा गुण केवळ विद्वत्तेनें येत नाहीं, केवळ चांगल्या कुलांत उत्पन्न झाल्यानें येत नाही, आणि केवळ बुद्धिमत्तेनेंहि येत नाही. खरे आत्मबल हेंच होय, आणि उपनिषदांतील 'नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुधा श्रुतेन।' हें तत्त्व नीट लक्षांत ठेविले पाहिजे.

"पण अशा प्रकारचे आत्मबल नुसत्या विद्वत्तेनें अगर बुद्धिमत्तेनें प्राप्त होण्यासारखे नसून तें नैसर्गिकच पाहिजे हा सिद्धांत जरी खरा असला, तरी निश्चयी मनुष्यास हा गुण गीतेंत म्हटल्याप्रमाणे अभ्यास आणि वैराग्य यांच्या योगानें क्रमाक्रमानें नेहमींच प्राप्त होण्यासारखा असतो, हेंहि विसरतां कामा नये थोर व उदार पुरुषांची चरित्रें शीलचारित्र्यवर्धनास उपयोगी पडतात यांतील बीज हेंच होय ...म्हणून म. गांधीचें चरित्र ह्या व्यापक दृष्टीनें सर्वांनींच वाचावें अशी त्यांस आमची शिफारस आहे."

म. गांधीच्या चरित्रासंबंधी व त्यानी शोधून काढिलेल्या सत्याग्रहाच्या मार्गासंबंधीं लोकमान्यांनी काढिलेले हे गौरवपूर्ण उद्‌गार अनेक दृष्टींनीं महत्त्वाचे आहेत. लो. टिळक हे १८९५ पासून १९०५ पर्यंतच्या काळांत आपल्या परिस्थितीस अनुरूप असा स्वराज्यप्राप्तीच्या साधनाचा शोध करीत होते असें वर म्हटलें आहे. १९०५ सालीं त्यांनी 'बहिष्कार-योगा'च्या रूपानें हा नवा स्वराज्यसाधनरूप योग राष्ट्रापुढे मांडिला. ह्या बहिष्कार-योगाच्या शोधानंतर राष्ट्रीय पक्षाचे राजकारण निःशस्त्र क्रांतिवादाच्या निश्चित स्वरूपांत राष्ट्रापुढें आलें आणि निःशस्त्र राजकारणास लागणारे आत्मबल आपल्या तपश्चर्येनें निर्माण करून म. गांधींनी तें राष्ट्रीय राजकारण आजपर्यंत पुढें चालविले आहे.

वरच्या उताऱ्यांत लोकमान्यांनीं गांधीजींच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा उपनिषदांतील आत्मबल म्हणून गौरव केला असून लोकांनीं हें आत्मबल आपल्या अंगीं

बाढविण्यासाठी म. गांधीच्या चरित्राचें अध्ययन व मनन करावें असें म्हटले आहे. त्याच सत्याग्रही तत्त्वज्ञानासंबंधीं बॅ. सावरकर यांनीं लोकमान्यांच्या विसाव्या पुण्यतिथीच्या दिवशीं पुढील उद्‌गार काढले:—

" His philosophy is inherently ridiculous and harmful to the Indian Nation. It can well be described as a relic of primitive age. In these days of machine and aeroplane, we are not prepared to follow the old ways and methods which are out of tune with the present-day methods. We must face the machine with machine and the aeroplane with aeroplane Gandhiji's philosophy lacks in all these respects, and we therefore, cannot hold it even with the pair of tongs "

—The Mahratta, Aug 4, 1939

बॅ. सावरकरांच्या मतें, " त्यांचे ( म. गांधीचे ) तत्त्वज्ञान हें मूलतःच हास्यास्पद व भारतीय राष्ट्राला हानिकारक असें आहे. मानव संस्कृतीच्या बाल्यावस्थेतील अवशेष म्हणून त्याचे यथार्थ वर्णन करतां येईल. विमानांच्या व यंत्राच्या या काळांत आजकालच्या पद्धतींशीं विसंगत असलेल्या जुन्यापुराण्या मार्गांचें व पद्धतींचें अनुकरण करण्यास आम्ही तयार नाहीं. आज यंत्रापुढें यंत्र व विमानापुढें विमान उभें केले पाहिजे. गांधीजीच्या तत्त्वज्ञानांत या सर्व गोष्टींचा पूर्ण अभाव असल्यामुळें आम्ही त्याला दुरूनहि स्पर्श करू शकत नाहीं. " आणि हें एका अर्थी खरेहि आहे. उपनिषत्कार ऋषी हे मानवकुलाच्या बाल्यावस्थेंतच होऊन गेले नाहीत काय ? शिवाय ते रानांत रहात असल्यामुळें त्यांचें आत्मबल हें रानटी संस्कृतीचेंच प्रतीक नव्हे काय ? आजच्यासारखी नागर-संस्कृति त्यांना कोठे उत्पन्न करतां आली ? त्यांनीं बॉंबगोळे, टॅक्स यांची प्रगत संस्कृति कोठें निर्माण केली ? या अतिप्राचीन, रानटी, बालसंस्कृतीचा अवशेष असा जो सत्याग्रह तो आजच्या सुधारलेल्या संहारयुगाला कसा साजणार ? अर्थात् सत्याग्रहाचें तत्त्व मूलतःच हास्यास्पद नव्हे काय ?, ब्रिटिशांच्या वैमानिक हल्ल्यांना गांधीजींसारख्या रानटी यतीचे आत्मबल कसें तोंड देणार ? त्यास तोंड देण्यास विमानांचे ताफे व यांत्रिक तोफखानेच उभारले पाहिजेत. हिंदुमहासभेच्या धर्मवीरांनीं उघडलेल्या लष्करी शिक्षणाच्या बालशालेव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्या संस्थेला आज हें सशस्त्र

विमानांचे ताफे व यांत्रिक तोफांचे तोफखाने उभारण्याचें सामर्थ्य आहे ? आणि अशी शस्त्रास्त्रसंपन्न हिंदुमहासभा म. गांधीच्या रानटी तत्त्वज्ञानाला दुरूनहि स्पर्श कसा करणार ? 'सरसेनापति' भोपटकरांनी निःशस्त्र असतांनाहि भागानगरांत 'भगवा झेंडा' नाचविलाच कीं नाही ? आणि सावरकरांनी पेशवाईची थकलेली खंडणी वसूल करून बिनदाढीच्या निजामाची दाढी कापलीच की नाही ? हा अपूर्व पराक्रम गांधीजीच्या रानटी अवस्थेतील आत्मबलानें झाला असता काय ? खरोखर, लोकमान्यांनी जर हा पराक्रम पाहिला असता, तर म. गांधींच्या चरित्राऐवजी बॅ. सावरकरांच्या चरित्राला प्रस्तावना लिहून त्यांचेंच चरित्र मनन करण्यास त्यांनी लोकांना उपदेशिलें नसतें काय ?

पण तात्याराव सावरकर यांनी या भाषणांत स्पष्टच सांगितले आहे की, आम्ही लोकमान्यांच्या शिकवणीनें मुळींच बांधलेलों नाही तीत परिस्थित्यनुसार प्रगति करण्याचा हक्क आम्हांस खास आहे विसाव्या शतकांतील लोकमान्यांना उपनिषदातील आत्मबल हा रानटी अवस्थेचा अवशेष वाटला नसला, तरी त्यांच्या पश्चात् गेल्या एकोणीस वर्षांतील विमानविद्येंतील व संहारशास्त्रांतील सुधारणेमुळें आज तेंच आत्मबल रानटी संस्कृतीचा अवशेष म्हणून गणण्यायोग्य, हास्यास्पद व हानिकारक बनले नाही असें मानणे, हा आपल्या अंधभक्तीचाच एक नमुना होणार नाही काय ?

असो. लोकमान्यांचे चिरतन तत्त्व तात्यारावांनी पुढील कारिकेत गोविलें आहे:

**" राष्ट्रस्वतंत्रताध्येयम् । यथासाध्यं च साधनम् ।<br>अभ्युत्थानं च हिंदूनाम् । प्रोक्तं श्रीतिलकेन वै ॥ "**

अर्थात् या कारिकेच्या आधारेंच लोकमान्यांच्या राष्ट्रवादाचा थोडा विचार करूं. यांपैकी " राष्ट्रस्वतंत्रताध्येयम् " यासंबंधी फारसा मतभेद होण्याचा संभव नाहीं. कारण, तें आज सर्वांनाच मान्य असें ध्येय बनलेलें आहे. मतभेद काय तो " यथासाध्यं च साधनम् " व " अभ्युत्थानं च हिंदूनाम् " यांसंबंधींच होण्याचा संभव आहे. तेव्हां त्याविषयीं लोकमान्यांचें धोरण काय होतें तें पाहूं, आणि प्रथमतः त्यांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांचाच विचार करूं.

## लोकमान्यांची ढाल-तलवार

लोकमान्यांनी शिवजयंतीचा उत्सव चालू केला असला, तरी शिवरायाची

भवानी तलवार ब्रिटिश सत्तेशीं लढण्याम व स्वातंत्र्य संस्थापनेस आज उपयोगी पडणार नाही, हें त्यांना स्पष्टपणे दिसत होतें, अर्थात् त्यांनीं आपलें कोणतें साधन ठरविलें होतें याचा विचार अवश्य केला पाहिजे मागे म्हटल्याप्रमाणे १८९५ पासून १९०५ पर्यंतच्या काळात अत्यंत शात चित्तानें विचार करून त्यांनी आपल्या परिस्थितीस अनुरूप असें बहिष्कार-योगाचे साधन शोधून काढिले, आणि त्यांचें सर्वव्यापी अंतिम स्वरूप १९०५ पासून १९०७ सालापर्यंतच्या काळांत राष्ट्रापुढे मांडिले. या बहिष्कार-योगाचा प्रभाव व स्वरूप त्यानी १९०७ सालच्या " Tenets of the New Party " या आपल्या कलकत्त्याच्या व्याख्यानात पुढीलप्रमाणे माडिलें आहे:—

"What the new party wants to do is to realise the fact that your future rests entirely in your hands If you mean to be free, you can be free. if you do not mean to be free, you will fall and be for ever fallen So many of you need not like arms, but if you have not the power of active resistance, have you not the power of self-denial and self-abstinence in such a way as not to assist this foreign Government to rule over you? This is 'boycott' and this is what is meant when we say that boycott is a political weapon We shall not give them assistance to collect revenue and keep peace. We shall not assist them in fighting beyond the frontiers or outside India with blood and money. We shall not assist them in carrying on the administration of justice. We shall have our own courts, and when time comes we shall not pay taxes. Can you do that by your willed efforts? If you can, you are free to-morrow."

—Tilak's Speeches, Pp 117-118

या उताऱ्यांत आजच्या परिस्थितींत आपणांस कोणतें शस्त्र स्वराज्यस्थापनेस उपयोगी पडेल याचें स्पष्ट उत्तर लोकमान्यांनीं दिलेले आहे. लोकमान्यांना अभिप्रेत असणारी 'भवानी तलवार' ती हीच होय, आणि हिचे दर्शन त्यांना बारा वर्षांच्या तपश्चर्येचें फळ म्हणून शिवोत्सवानंतर व गणेशोत्सवानंतर

झाले होतें. बॅ. सावरकरांप्रमाणे " यथासाध्यं च साधनम् " म्हणजे " साध्य असेल तें साधन वापरावे ", किंवा " साधनानामनेकता " म्हणजे " भिन्न परिस्थितीत भिन्न साधनें लागतात ', असलें उडवाउडवीचे, संदिग्ध अथवा निरर्थक उत्तर देऊन राष्ट्राचें व्यावहारिक नेतृत्व करणारे कच्चे गुरु लोकमान्य नव्हते ! राष्ट्रें आपल्या नेत्यांना आपल्या मोक्षाचें निश्चित व एकच साधन कोणतें आहे, असा प्रश्न विचारीत असतात. त्या वेळी " साधनानामनेकता ", " यथासाध्यं च साधनम् " असलीं शुष्क तात्त्विक उत्तरें देऊन " ज्याला जे साधेल त्यानें तें करावें ", " ज्या वेळी जे योग्य असेल त्या वेळी तसें वर्तन करावे ", " आपापल्या परिस्थितीचे निरीक्षण करून तिच्यावर योग्य उपाय योजावा, " अशी उत्तरें राष्ट्रगुरूंनी दिली, तर " व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥" असें गुरूला छेडल्याखेरीज राष्ट्ररूप शिष्य राहणार नाहीत. आपल्या परिस्थितीस अनुरूप अशी परिणामकारक साधनें कोणती याचीं उत्तरें सामान्य जनांस देता आली असती, तर त्यांस राष्ट्रनेत्यांची आवश्यकताच भासली नसती

तसेंच " यथासाध्यं च साधनम् " हें सूत्र केवळ तात्त्विक दृष्ट्याहि सदोष आहे. कारण, साधन हें केवळ आपणांस झेपेल असेंच असून कार्यभाग होणार नाहीं, तर तें उपयोगात आणिलें असतां आपले ध्येय प्राप्त करून देण्याचे सामर्थ्यहि त्यात असावे लागतें. उदाहरणार्थ, अर्जे-विनत्यांचा किंवा भिक्षांदेहीचा सनदशीर मार्ग सर्वांस सुलभ असल्यानें " यथासाध्यं च साधनम् " या सावरकरांच्या सूत्रात बसतो. परंतु केवळ कायदेशीर किंवा सनदशीर राजकारण हें साध्य असलें तरी तें प्रभावी नसल्यानें तें लोकमान्यांनीं त्याज्य ठरविलें, किंवा तेवढ्यानें आपला कार्यभाग होणार नाहीं असें आजन्म लोकांना शिकविले. लोकमान्यानी कायदेशीर व सनदशीर राजकारणाचा मुळींच उपयोग केला नाहीं असा याचा अर्थ नाही. पण कायदेशीर राजकारण ही त्यांच्या राजकारणांतील ' भवानी तरवार ' नव्हती, तर ती त्यांची ढाल होती; आणि ' स्वदेशी ' व ' बहिष्कार ' ही त्यांची शस्त्रास्त्रें होतीं. कायदेशीर व सनदशीर राजकारणाच्या आश्रयानें आपणांवर होणाऱ्या प्रतिपक्षाच्या प्रहारांपासून ते राष्ट्रीय शक्तीचें संरक्षण करीत असत, आणि स्वदेशी-बहिष्काराच्या आश्रयानें ते ब्रिटिश साम्राज्यसत्तेवर प्रहार करीत असत. त्यांपैकीं ' बहिष्कार-योग ' ही

त्याची 'भवानी तरवार' होती, आणि तिचा उपयोग करण्याची शक्ति राष्ट्रांत आली म्हणजे राष्ट्र एका दिवसांत स्वतंत्र होऊं शकेल, (if you can do that you will be free from to-morrow) असे त्यांचे आत्मविश्वासाचे निश्चित शब्द आहेत म. गांधीनीं हीच गोष्ट १९२० साली "असहकार-योगाने एका वर्षांत स्वराज्य मिळेल" या शब्दांनी व्यक्त केली. पण तिची चेष्टा करण्यांत लोकमान्यांच्या एका शाखेच्या शिष्यांनी आपल्या जीविताची वीस वर्षें वेंचिली! आज लोकमान्यांच्या राजकारणांत परिस्थित्यनुरूप भर घालणाऱ्या दुसऱ्या शाखेचे शिष्य विमानास विमानांनी आणि यांत्रिक तोफांस यांत्रिक तोफांनी तोंड देण्याचे नवें राजकारण रचीत आहेत! अर्थात् लोकमान्यांचा 'बहिष्कार-योग' हा त्यांनीं आतां प्रभावहीन ठरविला आहे. परंतु **त्यांचें प्रत्यक्ष आचरण मात्र सशस्त्र क्रांतीच्या प्रयोगावरून निःशस्त्र प्रतिकाराच्या मार्गावर आलें आहे,** आणि म्हणूनच आतां "**यथासाध्यं च साधनम्**" हा विवेक त्यांना सुचला आहे! पण हा वृद्धावस्थेंतील विवेक तारुण्यांत ज्यांनी साधिला तेच 'लोकमान्य' किंवा 'महात्मा' बनत असतात. साध्य काय व असाध्य काय, युक्त काय व अयुक्त काय, अनुरूप काय व अननुरूप काय, हें कळण्यासच स्थितप्रज्ञा व स्थिरबुद्धि लागतात. "यथासाध्यं च साधनम्" हे पोकळ तत्त्व समजण्यास फारसा विवेक लागत नाही.

लोकमान्यांनीं जो शिवाजी-उत्सव चालू केला, तो शिवाजीमहाराज हिंदु होते किंवा महाराष्ट्रीय होते म्हणून केला नव्हता, **तर शिवाजीमहाराज ही एक जुलमी सत्तेविरुद्ध लढून स्वराज्य-संस्थापना करणारी स्वातंत्र्यमूर्ति होती** म्हणून केला होता. त्यांनीं बंगालमध्यें शिवाजीउत्सवासंबंधी बोलतांना पुढील उद्गार काढिलेले आहेतः—

"Unfortunately, we had no political festival to keep up the memory of our heroes except the National Congress. This is the reason why the Shivaji festival was started in Maharashtra with the hope that it will spread all over India without distinction of caste or creed... Some objected to it because they were Mohamedans.

That objection no longer exists. Shivaji did not fight against the Mohamedans, but against the tyrannical power that existed at that time .. That is the spirit in which you must read the life of Shivaji."

—Tilak's Speeches, P. 99

याच विषयासंबंधीं बोलतांना ते कलकत्त्याच्या दुसऱ्या भाषणांत **शिवाजी-महाराजांच्या साधनांचें अनुकरण आपणांस करावयाचें आहे,** असें स्पष्टपणें बजावतातः—

" Shivaji was born at a time when there was darkness and helplessness. I believe that Bengal will produce such a leader at this juncture who will follow the great Mahratta leader not in method but in spirit."

Ibid, P. 102

अशा प्रकारें "यथासाध्यं च साधनम्" या सावरकरी सूत्राचा विचार लोकमान्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाच्या आधारें केला. आतां त्यांचें जें तिसरे सूत्र "अभ्युत्थान च हिंदूनाम्" त्याचा व हिंदुराष्ट्र निर्माण करण्याच्या सावरकरी ध्येयाचा विचार करू.

### धर्म व राष्ट्रवाद

लोकमान्यांनी केवळ हिंदूचें अभ्युत्थान केलें, हिंदुराष्ट्र निर्माण करणें हें त्यांचें ध्येय होतें, असें बरळणे म्हणजे त्यांचा सर्वांत मोठा अपमान करण्या-सारखेंच आहे; लोकमान्यांनीं केवळ ब्राह्मणांतच चळवळ केली आणि पुनः पेशवाई स्थापन करावी असें त्यांना वाटत होतें, या म्हणण्याइतकेंच हें विपर्यस्त आहे. लोकमान्यांच्या काळांत आपली ब्राह्मणेतर जनता आजच्याइतकी जागृत झाली नव्हती, मुसलमान लोकांतहि राष्ट्रीय पक्ष निर्माण झाला नव्हता, हें म्हणणें एकवेळ वस्तुस्थिती चेवर्णन या दृष्टीनें खरें असेल; पण **केवळ हिंदूंचेंच 'अभ्युत्थान' करणें हें लोकमान्यांचें साध्य होतें आणि हें अभ्यु-त्थानहि मुसलमानांविरुद्ध लढण्यासाठीं ते करीत होते असें दर्शविणें,**

**आणि आपल्या हिंदुमहासभेच्या व हिंदुराष्ट्रनिर्मितीच्या भ्रामक ध्येयास त्यांचा आशीर्वाद होता असें भासविणें, ही उघड उघड आत्मवंचना किंवा लोकवंचना आहे** लो. टिळकांनीं या अराष्ट्रीय व राष्ट्रविघातक भावनेला कधींहि जागृत केले नाहीं. याच्या उलट, "**ब्रिटिशांनीं स्वराज्याचे सर्व हक्क मुसलमानांना दिले तरी तें मला चालेल,**" असे उद्‌गार त्यांनीं लखनौचा करार करून मुसलमानांशीं समेट करतांना काढलेले सर्वप्रसिद्ध आहेतः—

"It has been said, Gentlemen, by some, that we Hindus have yielded too much to our Mohamedan brethren. I am sure, I represent the sense of the community all over India when I say, that we would not care if the rights of self-government are granted to the Mohamedan community only."

—Tilak's Speeches, P. 44

कोठ हा लोकमान्यांचा उदार राष्ट्राभिमान आणि कोठें तात्याराव सावरकरांची संकुचित हिंदुराष्ट्रवृत्ति ! लोकमान्यांचा उदार राष्ट्राभिमान हाच आजच्या राष्ट्रसभेनें या बाबतीतहि चालविला आहे, आणि त्याचे कायदेशीर वारस बनलेले मूठभर संकुचित वृत्तीचे महाराष्ट्रीय ब्राह्मण मात्र भगव्या झेंड्याची आणि पेशवाईतील खंडणी निजामाकडून वसूल करण्याची मध्ययुगांतील शिलेदारी भाषा बोलून इतिहास व धर्म यांचा राष्ट्रविघटनेस दुरुपयोग करीत आहेत, असेंच कोणीहि म्हणेल

लो टिळक अथवा म. गाधी यांची इतिहासाकडे व धर्मभावनेकडे पाहण्याची दृष्टि फारच विशाल व खोल आहे, आणि म्हणूनच त्यांना धर्माच्या व ऐतिहासिक स्वाभिमानाच्या आधारावर हिंदी राष्ट्राची निर्मिति करतां आली. लो. टिळक व म. गांधी ही हिंदु-संस्कृतीची आधुनिक भारतालाच नव्हे, तर आधुनिक जगाला बहुमोल देणगी आहे म. गांधीच्याप्रमाणे लोकमान्यांनाहि हिंदुधर्माची महती त्याच्या सहिष्णुतेंत–सर्वधर्मसमानतेच्या भावनेंत आहे, असे वाटत होतें. हीं महती वर्णितांना ते स्पष्टच म्हणतात, "Hindu religion

tolerates all religions. Our religion says that all religions are based on Truth. 'You follow yours I mine," याच तत्त्वाचे श्रेष्ठत्व 'गीतारहस्यां'त पुढीलप्रमाणें वर्णिलें आहेः—

"यावरून हे तत्त्व वैदिक धर्मात फार प्राचीन कालापासून चालत आलेले आहे असे सिद्ध होतें, आणि अलीकडे झालेल्या श्रीशिवाजीमहाराजांसारख्या वैदिकधर्मीय कर्त्या पुरुषाच्या अंगांत त्याच्या परमोत्कर्षाच्या वेळींहि परधर्मसहिष्णुता हा दोष आढळून येत नव्हता हे या तत्त्वाचेच फल आहे. ईश्वर सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, किंबहुना, त्याहिपलीकडील म्हणजे अचिन्त्य आहे, हे खरें तत्त्व न ओळखतां अमुक काली किंवा अमक्या देशांत, अमक्या आईच्या पोटी, अमक्या वर्णाचे, नांवाचें किंवा आकृतीचे त्यानें जे व्यक्त रूप धारण केले तेवढेच काय तें खरे, असा नामरूपाचा खोटा अभिमान बाळगून त्यासाठी तलवारीनें एकमेकांचे प्राण घेण्यापर्यंत मजल यावी हे मनुष्याच्या शोचनीय मूर्खपणाचें लक्षण आहे गीतेंतील भक्तिमार्गास 'राजविद्या' अशी संज्ञा आहे खरी; 'पण माझें दृश्य स्वरूपदेखील मायाच, माझें खरे स्वरूप पाहणे असल्यास ही माया सोडून पलीकडे जा, असा ज्याप्रमाणे खुद्द भगवंतांनीं यथार्थ उपदेश केला आहे तसा उपदेश करून व 'अविभक्तं विभक्तेषु' या सात्त्विक ज्ञानदृष्टीने **सर्व धर्मांतील ऐक्य** ओळखून, भक्तिमार्गांतील खोट्या बडाचा समूळ बीमोड करणारे धर्मगुरू प्रथम कोठें उदयास आले किंवा त्यांच्या मताचे अनुयायी अधिक कोठें आहेत याचा शोध करूं लागल्यास आमच्या भरतभूमीस अग्रस्थान दिले पाहिजे, असें म्हणणे भाग पडतें. **राजविद्येचा आणि राजगुह्याचा हा प्रत्यक्ष परीस अनायासें हातांत पडला असतां अज्ञानाचे चष्मे डोळ्यांस लावून तो गारगोटीच आहे असें म्हणावयास आमच्यापैकीं कांहींजणांनीं तरी तयार व्हावें, हें आमचें दुर्दैव होय!**"

—गीतारहस्य, पृ० ४२१-२२

सर्वधर्मसमानत्वाचा हा परीस ओळखण्याची दिव्य दृष्टि लोकमान्याना होती म्हणूनच त्यांनी भगवद्गीतेंतील 'राजविद्ये'च्या आधारे अनेक धर्मांच्या लोकांनी भरलेल्या खंडतुल्य भारतवर्षाचें एकजीव राष्ट्र बनविलें, आपल्या आजच्या

राजधर्माचें फार मार्मिक वर्णन या लेखाच्या शिरोभागी दिलेल्या दादाभाई नौरोजींना उद्देशून लोकमान्यांनीं लिहिलेल्या अवतरणांत केलेले आहे हा उतारा १८९६ सालचा आहे. या त्यांच्या मतांत त्यांनीं आमरण फरक केला नाहीं, इतकेच नव्हे, तर १९२० सालीं स्थापिलेल्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहीरनाम्यांतहि त्यांनीं हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठी पुढील भाग समाविष्ट केलेला होताः—

"धार्मिक बाबतींत सहिष्णुता असावी आणि स्वतःपुरता ज्याचा त्याचा धर्म ज्याला त्याला पवित्र असून इतरांनी त्यांत बिघाड केल्यास त्यापासून त्या धर्माचें रक्षण करणें हें सरकारचें न्याय्य कर्तव्य आहे, असें या पक्षाचें मत आहे. तसेंच मुसलमानाच्या धार्मिक भावना व कुराणांतील वचनें यांस अनुसरून खिलाफतीचा प्रश्न सोडविला जावा अशी जी मुसलमानांची मागणी आहे, तिला या पक्षाचा पाठिंबा आहे" असे सामान्य धोरण सांगून पुढे तपशील सांगतांना ९ व्या कलमांत खालील गोष्टी नमूद केल्या आहेतः—

" **राष्ट्रीय ऐक्य साधण्यासाठीं** सर्व प्रांतांच्या किंवा लोकांच्या सामान्य व्यवहारार्थ एक देशीभाषेचा प्रचार करणें, **भिन्नधर्मीयांमधील व्यवहार-संबंध अधिकाधिक सलोख्याचा करणें, विशेषतः हिंदु-मुसलमानांचें ऐक्य दृढ करणें.**"

वरील उताऱ्यावरून खिलाफत-चळवळीला सहाय्य करणें, हिंदु-मुसलमानांचें ऐक्य दृढ करणें आणि कांही बाबतींत मुसलमानांना अल्पसंख्य म्हणून थोडया अधिक सवलती देणें, हें जें धोरण राष्ट्रसभेनें अनुसरलें तें लोकमान्यांच्या धोरणास धरूनच होतें, हें वाचकांच्या लक्षांत येईल. यावरून **हिंदु-राष्ट्र स्थापणें हिंदूंचें मुसलमानांविरुद्ध अभ्युत्थान करणें**, **अथवा हिंदु-राष्ट्रपति ही पदवी धारण करून हिंदुमहासभेकडून स्वराज्याची संस्थापना होईल असें उद्घोषित करणें, हें धोरण किती अविवेकी व असमंजस आहे आणि त्यास लोकमान्यांच्या राजकीय परंपरेचा आधार मिळणें कसें अशक्य आहे,** याची वाचकांस निःसंदिग्ध कल्पना येईल.

वरील प्रयत्न हा केवळ राजकीय व राष्ट्रीय दृष्टया विघातक आहे, इतकेंच नव्हे, तर हिंदुधर्माचें जे परमोदार सहिष्णुतेचें तत्त्व त्याच्याशींहि तो विसंगत असून इस्लाम-धर्माच्या मूळच्या सहिष्णु वृत्तीला मोंगल लोकांनीं जसें असहिष्णु, संकुचित व धर्मवेडें स्वरूप दिलें, त्याचप्रमाणें हिंदु-संस्कृतीला विकृत व धर्मवेडें स्वरूप देऊन तिला कमीपणा आणणारेहि तें आहे, असेंच लोकमान्यांना वाटलें असतें अशी आमची खात्री आहे. आडदांड मोंगली टोळ्यांनीं इस्लाम-धर्मांतील सहिष्णुता व बुद्धिस्वातंत्र्य नष्ट केलें आणि मुसलमानी संस्कृतीचा विनाश केला, तसाच प्रकार हें नवीन धर्मवेड हिंदु-संस्कृतींत शिरल्यास होण्याचा संभव आहे पण म. गांधीच्यासारखे हिंदु-संस्कृतीचे मूर्तावतार तळपत असतां या अंधकाराचा प्रसार होण्याचा मुळीच धोका नाही. ज्या लोकांनीं त्या सूर्याकडे पाठ फिरविलेली आहे त्याना मात्र आपल्याच छायेचा काळोख दिसत आहे! इतर सर्व जगांत भारतीय संस्कृतीचा सत्यमय व प्रेममय प्रकाश पसरूं लागला आहे. ज्या भारतीय स्वातंत्र्य-संग्रामांतून ही सत्याग्रही संस्कृति निर्माण होऊन तिचे तेज सर्वत्र फैलावत आहे, त्या भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाची सर्व पूर्वसिद्धता ज्या लोकमान्यांनीं केली त्याना भारतीय राष्ट्र कधीहि विसरणार नाही; आणि त्यांनीं उपदेशिलेले सर्वधर्मैक्याचे तत्त्व व त्या खंबीर तत्त्वावर उभारलेलें राष्ट्रसभेचें धोरण विजयी झाल्याविना कधींहि राहणार नाही!

## लोकमान्य–संप्रदायाची दुसरी विकृति

येथपर्यंतच्या विवेचनावरून सावरकरी धोरण ही लोकमान्य-पंथाची दुसरी विकृति आहे हें आमचें मत वाचकांस पटूं शकेल. लोकमान्यांच्या विचारांचें एक विकृत स्वरूप श्री. केळकरांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांत नांदत होतें. श्री. केळकर हे स्वतःला ‘ बुद्धिवादी ’ म्हणवून महाराष्ट्र बुद्धिवादी असल्यामुळें तो गांधींच्या पाठीमागे कधींहि जाणार नाहीं असें प्रतिपादीत, तरीहि ते आपण महाराष्ट्रांतील बुद्धिवादाचे संस्थापक आगरकर यांचे अनुयायी आहोंत असें म्हणत नसत आणि म्हणत नाहींत. वस्तुतः ते आगरकरांप्रमाणें बुद्धिवादीहि नव्हेत; कारण, बुद्धिवादांत आपल्या बुद्धीला जें सत्य पटेल त्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्याचें धोरण अवश्यमेव अंतर्भूत होतें, किंबहुना, तोच त्याचा आधार आहे. ते लोकमान्यांप्रमाणें राष्ट्रवादी किंवा अध्यात्मवादी नव्हेत, हें सांगावयासच नको. ते केवळ व्यवहारवादी म्हणजे राजकीय किंवा राष्ट्रीय व्यवहारवादी

नसून सामान्य, सांसारिक व्यवहारवादी आहेत. बुद्धिवादी व राष्ट्रवादी विभूतीच्या तत्त्वांचें अनुकरण करतांना संसारी लोकांना कोणकोणत्या अडचणी येतात हें उत्कृष्टपणें लोकांपुढे मांडून अशा विभूतींच्या नादीं लागून आपलें नुकसान करून घेऊं नये, असा इशारा देण्याचें कार्य ते उत्तम प्रकारे करूं शकतात. या त्यांच्या प्रकृतिगुणामुळेंच लोकमान्यांच्या आध्यात्मिक राष्ट्रवादाची परंपरा चालविण्याऐवजी आगरकरांच्या बुद्धिवादाची परंपरा चालविण्याचें कार्य जरी त्यांच्या अंगावर पडतें, तरी त्याचीहि विकृति करण्याचे कार्य त्यांना खचित करतां आलें असतें. परंतु हें कार्य त्यांनी केलें नसलें, तरी महाराष्ट्रांतील इतर अनेक सुधाकरांनीं केलेंच आहे. लोकमान्यांच्या संप्रदायाला भावनाहीन बुद्धिवादी स्वरूप मात्र केळकरांनी दिलें. तथापि, महाराष्ट्रीय जनतेनें लोकमान्यांचें राजकारण राष्ट्रसभाच चालवीत आहे हें ओळखिलें आणि ती राष्ट्रसभेकडे ओढिली गेली. निःसीम संसारचतुर बुद्धिजीवी वर्ग तेवढा केळकरांना बिलगून राहिला. म गांधींची बुवाशाही नष्ट करण्यास केळकराचा व्यवहारदक्ष, संसारचतुर बुद्धिवाद अपुरा पडला. अर्थात् हा राजकीय प्रयोग आतां पुढें चालूं शकत नाही असें निर्विवाद सिद्ध झालें.

यामुळें आतां नवा प्रयोग चालू झाला आहे याचा आधार विभूतिवाद हा आहे. पण हा विभूतिवाद मुत्सद्दीगिरीनें लोकसंग्रहार्थ स्वीकारिलेला आहे. आत्मबल, अध्यात्म, साक्षात्कार हीं सर्व ढोंगे असली तरी तीं लोकसंग्रहाला आवश्यक आहेत, हें या नव्या प्रयोगांत गृहीत धरलेले आहे. लोकमान्यांच्याप्रमाणें याला धर्माचा व इतिहासाचाहि आधार घेतलेला आहे, आणि तो अगदीं स्थूलबुद्धीच्या सामान्य जनतेस–शाळेंतील मुलांसहि–सहज पटेल अशा स्वरूपांत घेतलेला आहे. **पहिल्या राजकीय प्रयोगास ' भावनाहीन बुद्धिवाद ' म्हटल्यास या दुसऱ्या प्रयोगास ' बुद्धिहीन भावनावाद ' असें म्हणतां येईल**. याला ' बुद्धिहीन ' म्हणण्यांत त्याच्या पुरस्कर्त्यांपाशीं मुत्सद्दीगिरीची बुद्धि नाहीं असें सुचविण्याचा हेतु नाहीं; फक्त बुद्धियोगांतील समत्वबुद्धि, स्थिरबुद्धि किंवा आत्मनिष्ठ बुद्धि हा तिचा आधार नाही, एवढेंच येथे सुचवावयाचें आहे. केळकरी राजकारणांतील चतुरबुद्धि आणि सावरकरी राजकारणांतील उद्दीपित भावना यांचा अपूर्व योग यांत साधला गेला आहे. मात्र हा एवंगुणविशिष्ट नवा राजकीय प्रयोग किंवा लोकमान्यांच्या राजकारणाचा दुसरा विकृतयोग

पहिल्याइतकाहि चिरतन होणार नाही अशी आमची खात्री आहे. तथापि यापासून राष्ट्राभिमानाच्या नांवाखालीं एक धर्मवेडी माथेफिरू वृत्ति कांहीं अविवेकी तरुणांत निर्माण होऊन त्यांच्या जीविताचा होम होणे कांही अशक्य नाहीं ! तरी **लोकमान्यांचा खरा अभिमानी महाराष्ट्र व विशेषतः तरुण महाराष्ट्र त्यांच्या राष्ट्रोन्नतिकर शिकवणुकीचें सत्य स्वरूप लक्षांत घेऊन या नवीन अविवेकी हिंदुराष्ट्रधर्मप्रचारानें आपली अधोगति होऊं देणार नाहीं, अशी आम्ही आशा बाळगितों.**

लोकशिक्षण :<br>ऑगस्ट, १९३९

# समाजसत्ताक लोकशाही पक्षाची आवश्यकता : : ५

"Of course there are excellent reasons why a statesman immersed in the actual conduct of affairs should confine his attention to the work which his hands find to do. But the fact that leading statesmen are of necessity so absorbed in the tasks of the hour, furnishes all the better reason why as many other people as possible should busy themselves in helping to prepare opinion for the practical application of unfamiliar but weighty and promising suggestions, by constant and ready discussion of them upon their merits."

—John Morley. 'On compromise,' P. 98

**नवा मनु**:—सध्यां हिंदुस्थानांत एक नवा मनु सुरू होत आहे. हिंदी राष्ट्रीय सभेनें आरंभिलेल्या राष्ट्रीय चळवळीचें फळ पदरांत पडण्याचा काळ समीप आलेला आहे. हिंदी राजकारणांतील अंतिम सत्ता इंग्लंडांतून निघून हिंदुस्थानांत येण्यास आतां फारसा काळ लागणार नाही. इंग्लंडांत बसून हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचीं सूत्रें हलविण्याचा काळ आतां उरलेला नाहीं, ही गोष्ट गेल्या महायुद्धाच्या वेळींच मॉंटेग्यूनीं ओळखिली आणि हिंदी स्वराज्याच्या ध्येयाची जाहीर घोषणा केली. तसेंच हिंदुस्थानांतून कच्चा माल नेऊन तो इंग्लंडांत पक्का बनवून पुनः इकडे विकण्याचा काल संपला. हिंदुस्थानांतील कच्च्या मालाचा पक्का माल बनविण्यास

लागणारे कारखाने खुद्द हिंदुस्थानांतच काढण्याचा नवा काळ आतां आला आहे, हें ओळखून ' इंडस्ट्रियल् कमिशन् ' व ' फिस्कल् कमिशन् ' नेमून हिंदी उद्योग-धंद्यांना थोडथोडे जकातींचे संरक्षण देण्याचेहि धोरण ब्रिटिशसरकारनें स्वीकारलें; व या संरक्षणाचा फायदा घेऊन अनेक ब्रिटिश भांडवलवाल्यांनीं आपलें भांडवल हिंदी कारखान्यांत व कंपन्यांत गुंतविलें. या नव्या परिस्थितीमुळें इंग्लंडांतील कारखानदारांच्या मालाला हिंदुस्थानांत गिऱ्हाइक मिळावें या इच्छेपेक्षां, हिंदुस्थानांत आपलें भांडवल सुरक्षित रहावें व त्याला संरक्षण मिळावें ही भावना ब्रिटिश भाडवलशाहींत अधिकाधिक जोरावूं लागली.

याच सुमारास म्हणजे गेल्या महायुद्धानंतर म० गांधी व समाजसत्ताक पक्ष यांचा उदय हिंदी राजकारणाच्या क्षितिजावर झाला. समाजसत्ताक पक्षाची प्रेरणा व सूत्रचालना मॉस्कोपर्यंत जाऊन भिडली. म० गांधीच्या राजकारणाच्या सूत्राचीहि गुंतागुंत तुर्कस्तानच्या केमालपाशापर्यंत जाऊन पोंचली. अर्थात् हिंदुस्थानचें परराष्ट्रीय राजकारण इंडिया ऑफिसांतील पेन्शनर सिव्हिल सर्व्हंटांच्या सल्ल्यानें चालविण्याचा काळ संपून व्हाइसरॉयच्या म्हणजे हिंदुस्थानसरकारच्या विचारानें चालविण्याचा काळ प्राप्त होऊं लागला. या नव्या काळाचा प्रभाव जाणूनच हिंदी मुसलमानानी केलेल्या खिलाफतीच्या चळवळीच्या जोरामुळें मॅटिग्यूनीं तुर्की तहाच्या प्रकरणांत भारतमंत्र्याच्या पदाचा राजीनामा दिला. तात्पर्य, हिंदुस्थानचें परराष्ट्रीय राजकारण सार्वराष्ट्रीय ( inter-national ) परिस्थितीमुळें आणि अंतर्गत जागृतीमुळें इंग्लंडांतून चालविणे अशक्य होऊं लागलें.

केमालपाशानें खलीफाला उडवून लावल्यापासून हिंदी राष्ट्रांत हिंदु-मुसलमानांची दुही होऊन व फेर-नाफेर वाद माजून म. गांधीचें राजकारण कांहीं काळ मागे पडलें. पण या काळांत हिंदुस्थानांतील मजुरांच्या चळवळींना दिवसेंदिवस बोल्शेविक वळण लागूं लागले; व गुप्त कटवाल्या क्रांतिकारकांच्या डोक्यांतहि समाजसत्ताक लोकशाहीचे विचार प्रविष्ट होऊं लागले. हिंदुस्थानांतील राज्यक्रांति केवळ राजकीय स्वरूपाचीच न होतां ती सर्वांगीण झाली तरच बहुजनसमाजाचें हित होईल, ही भाषा सर्वत्र निघूं लागली. हिंदुस्थानांत मोठमोठ्या संपाच्या वावटळी उठूं लागल्या. याचवेळीं सरकारनें रुपयाचा भाव वाढविला. तो कमी करून घ्यावा आणि इंग्लंडांतील सुवर्णनिधि हिंदुस्थानांत आणून तो हिंदुस्थानांतील कारखानदार व भांडवलवाले यांनीं स्थापन केलेल्या मध्यवर्ति पेढीच्या ताब्यांत द्यावा,

अशी चळवळ सुरू झाली. त्या निमित्तानें हिंदी भांडवलवाले आणि हिंदुस्थानांत येऊन स्थिर झालेले इंग्रज भांडवलवाले हे एक झाले. हिंदुस्थानांतील इंग्रज व हिंदी भांडवलवाले एक झाल्याचें हें पहिलेंच उदाहरण असलें, तरी त्याचें महत्त्व मजूर पुढाऱ्यांनीं ओळखिलें. यावेळीं हिंदी मजुरांची चळवळ दडपून टाकण्यासाठीं व तिचा परराष्ट्रीय सबध तोडून टाकण्यासाठीं सरकारनें ' पब्लिक् सेफ्टी ', ' ट्रेड डिस्प्यूट्स् ' सारखे जे कायदे केले, त्यावेळी हिंदी व इंग्रज भांडवलवाले एकमुखानें सरकारला मिळाले. इतकेंच नव्हे, तर ही या दोन वर्गांची गट्टी मॅंचेस्टरवाल्यांशीं सख्य होण्यापर्यंत जाऊन साम्राज्यसंरक्षक सवलतीच्या जकातीच्या धोरणास ( Policy of Imperial Preference) उचलून धरण्यापर्यंत हिंदी कारखानदारांचा अधःपात झाला! याची प्रतिक्रिया मजुरांच्या चळवळीवर होऊन मॉस्कोच्या थर्ड इंटरनॅशनलशीं आपली चळवळ उघडपणें जोडून घ्यावी असें प्रतिपादन करणारा पक्ष मजूर पुढाऱ्यांत निर्माण झाला. सारांश, कांहीं काळ हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळ दुभंगून, हिंदी कारखानदार लॅंकेशायरशीं आणि हिंदी मजूर मॉस्कोशीं एकरूप होऊन हिंदी राष्ट्रीयत्त्व सार्वराष्ट्रीय वर्गयुद्धा (class-war) च्या भोंवऱ्यांत विलीन होतें कीं काय, असेंहि वाटूं लागलें होतें.

इतक्यांत म. गांधींनीं स्वातंत्र्याचे निशाण आपल्या हातीं घेऊन हिंदी राष्ट्रीयत्वाला पुनः भरती आणिली; व यामुळें हिंदुस्थानांतील सर्व वर्गांचे लोक कांहीं काळ राष्ट्रीय वृत्तीनें भारून गेले. हिंदुस्थानांतील कारखानदार, जमीनदार व संस्थानिक यांनाहि हिंदुस्थानांत वर्गभावनाधिष्ठित सर्वांगीण सशस्त्र क्रांतीपेक्षां म. गांधींची निःशस्त्र क्रांति बरी वाटूं लागली; इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानांतील इंग्रज भांडवलवाल्यांनाहि तुलनात्मक दृष्टीनें म. गांधी बरे वाटूं लागले. परंतु म. गांधींनीं राज्यक्रांतीचें वातावरण निर्माण केले होतें. हें वातावरण फार काळ टिकल्यास त्याला समाजसत्ताक क्रांतीचें स्वरूप प्राप्त होऊन रशियाप्रमाणें हिंदुस्थानांत मोठा हलकल्लोळ माजूं शकेल, याची जाणीव म. गांधींच्या निःशस्त्र क्रांतीच्या चळवळीनें ब्रिटिश सत्ताधाऱ्यांसहि झाली. ही भावी भयंकर क्रांति टाळण्यास म. गांधीशीं तडजोड करून हिंदुस्थानांतील राज्यघटनेंत संस्थानिक, जमीनदार, कारखानदार वगैरे धनिक व सत्ताधीश लोकांचें प्राबल्य ठेवून हिंदुस्थानांत स्वराज्यसंस्था उभारणें याखेरीज अन्य मार्ग नाहीं, हें दूरदर्शी ब्रिटिश मुत्सद्यांनीं ताडलें; आणि संस्थानिक व ब्रिटिश प्रजाजन यांनीं सख्य केलें व

अल्पसंख्याकांचें–हिंदुस्थानांतील अँग्लो-इंडियनांचे–समाधान केलें म्हणजे संक्रमण-कालांत आवश्यक असणारे संरक्षक निर्बंध लादून हिंदुस्थानला स्वराज्य देण्यास आम्ही तयार आहों, असे ब्रिटिश प्रधानमंडळानें सर्व पक्षांच्या अनुमतीनें जाहीर केलें. अर्थात् हिंदुस्थानच्या राज्यकारभारांतील अंतिम सत्ता हिंदुस्थानातील लोकांवर, म्हणजे त्यांच्यांतील श्रेष्ठ वर्गावर सोंपविली असतां हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून जाऊन साम्राज्याचा शत्रु होणार नाहीं व आपण हिंदुस्थानांत गुंतविलेलें भांडवल सुरक्षित राहून त्याच्या औद्योगिक वाढीस लागणारे नवें भांडवलहि तो आपणाकडून घेऊं लागेल, अशा भरंवशानें ब्रिटिश मुत्सद्यांनीं हें आश्वासन दिलें आहे. कांहीं काळ सैन्य व परराष्ट्रीय राजकारण यांवर आपला ताबा ठेवून येथील श्रेष्ठ वर्गाचें स्थान आपण स्थिर केले असतां हिंदुस्थानांतील समाजसत्ताक सशस्त्र क्रांति आपण खात्रीनें टाळूं शकूं अशी ब्रिटिश मुत्सद्यांस आशा वाटत आहे, व म. गांधींशीं तडजोड करून हिंदुस्थानांतील राष्ट्रीय भावनेला त्यांनीं शांत केलें, तर या क्रांतीचें हिंसात्मक स्वरूप टळू शकेल असें आम्हांसहि वाटतें.

तथापि, याचा अर्थ समाजसत्ताक क्रांति त्यांना अजिबात टाळतां येईल असें आमचें मत आहे, असें मात्र कोणी समजूं नये. हिंदुस्थानांतील गेल्या तीन पिढ्यांनीं केलेल्या राष्ट्रीय चळवळीचें फळ म्हणून हिंदुस्थानला मिळणारी स्वराज्यघटना ही हिंदी जनतेचीं दुःखे निवारण करू शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. या हिंदी स्वराज्याचा पहिला परिणाम हिंदुस्थानांतील भांडवलशाहीची भरभराट हाच होणार आहे हिंदी शेतकरी–वर्गाचेहि हित करण्याचे सामर्थ्य या स्वराज्यांत येणार नाहीं. उलट, या स्वराज्याखाली उद्योगधंद्यांप्रमाणें शेतींतहि क्रांति होऊन कारखान-दार–वर्गाप्रमाणें जमीनदार–वर्गदेखील वाढण्याचा संभव आहे. जोंपर्यंत कार-खानदार व कामकरी आणि जमीनदार व शेतकरी असे वर्ग देशांत आहेत, तोंपर्यंत खरी लोकसत्ता प्रस्थापित होणें शक्य नाहीं. कारखानदार व जमीनदार हे वर्ग नष्ट करून कारखाने, जमिनी, खाणी वगैरे सर्व साधन–संपत्ति (producer's wealth) राष्ट्रीय मालकीची बनल्याखेरीज देशांतील बहुजनसमाजाची खरी उन्नति होणें किंवा करणें शक्य नाहीं. याचकरितां राष्ट्रांतील तरुण पिढीनें "समाज-सत्ताक लोकशाही" ( Socialistic Republic ) हें आपलें ध्येय निश्चित करणें अवश्य असून या ध्येयाच्या प्रचारार्थ व प्रस्थापनेसाठीं अविरत परिश्रम

करणारा एक समाजसत्ताक लोकशाही पक्षहि स्थापन करण्याचा काळ आतां आलेला आहे.

**समाजसत्ताक लोकशाही म्हणजे काय?** — समाजसत्ताक लोकशाही या शब्दप्रयोगांतील दोन्ही शब्दांचा अर्थ स्पष्ट करणें अवश्य आहे. प्रथमतः लोकशाही हा शब्द आम्हीं कोणत्या अर्थानें योजिला आहे तें विशद करूं. हिंदी लोकांना आतां लोकसत्तेची तहान लागली आहे हे निश्चित. ही लोकसत्ता ( Democracy ) आज दोन स्वरूपांत जगांत नांदत आहे. एक लोकसत्ताक राजशाही (Constitutional Monarchy) व दुसरी शुद्ध लोकशाही (Republic). दोन्ही स्वरूपांच्या राज्यव्यवस्थेत सत्ता लोकांच्याच हातीं असते; परंतु पहिलींत राज्याच्या शिरोभागी एक नामधारी राजा असतो, तर दुसऱ्या पद्धतीत राज्याचें आधिपत्य राष्ट्राध्यक्ष ( President ) नांवाच्या लोकनियुक्त व्यक्तीकडे असतें इंग्लंड हें पहिल्या पद्धतीचे उदाहरण असून अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, रशिया वगैरे दुसऱ्या वर्गांत येतात इंग्लिश लोक हे राजकीय बाबतींत एका अर्थानें पुराणप्रिय व मूर्तिपूजक आहेत, व म्हणूनच त्यांनी अनेक ऐतिहासिक कारणांमुळे आपल्या राज्यावर आनुवंशिक राजघराणे व राजशाहीचें बाह्य स्वरूप कायम ठेविलें आहे. त्यांचेंच अनुकरण करून आमच्यांतीलहि कांहीं लोक आपल्या देशांत हें लोकसत्ताक राजशाहीचें तत्त्व चिरंतन करूं इच्छीत आहेत. पण हें युक्त नसून आपण शुद्ध लोकशाहीच्या तत्त्वाचाच पुरस्कार केला पाहिजे. पहिली गोष्ट ही ध्यानांत घेतली पाहिजे की, सर्व ब्रिटिश साम्राज्यानें एक राजघराणें केवळ औपचारिक विधीकरितां, भावनेकरिता किंवा पुराणप्रियतेकरितां पोसणें आणि एका हिंदुस्थाननें पांच–सहाशें राजघराण्यांचा निरुद्योगी व समाजाला निरुपयोगी असा एक वर्ग पोसणें, यांत फार मोठें अंतर आहे. शिवाय इंग्लंडांतील राजघराण्याशीं तेथील लोकांच्या ज्या प्रकारच्या भावना निगडित झालेल्या आहेत, तशा आमच्या एतद्देशीय संस्थानिक वर्गाशीं झालेल्या नाहीत. उलट, सध्यांच्या संस्थानिकांच्या पूर्वजांनीं मोगल किंवा मराठे साम्राज्यांतील अधिपतींशीं द्रोह करून त्यांचे शत्रू जे इंग्रज त्यांना आपल्या राष्ट्रांत घेतलें, अशीच इतिहास साक्ष देईल. १८५७ च्या धामधुमीच्या प्रसंगींहि यांचें वर्तन राष्ट्रीय वृत्तीला धरून झाल्याचें आढळत नाहीं. तात्पर्य, ब्रिटिश लोकांना आपल्या राजघराण्यासंबंधीं ऐतिहासिक किंवा भावनेच्या दृष्टीनें जरी आदर वाटत असला, तरी तसा आदर

आमच्या पांच-सहाशें संस्थानिक राजांसंबंधी आम्हांस वाटण्याचा कांहींच संभव नाहीं. शिवाय इंग्रज लोकांनीं आपल्या शिरावर एका राजघराण्याचा भार वाहण्याचें ठरविले असलें, तरी ते लोक पक्के राष्ट्रनिष्ठ व लोकसत्तावादी बनलेले आहेत. एकदां राजाची मूर्ति फोडून शुद्ध लोकशाहीचा कांहीं काळ अनुभव घेतल्यानंतर केवळ अलंकार किंवा उपचार म्हणूनच त्यांनीं फिरून राजपदाच अवलंब सोयीसाठी केला आहे. पण आमचे लोक अद्यापि खरे राष्ट्रनिष्ठ व लोकसत्तावादी झालेले नाहींत. त्यांच्यापैकी अनेकांच्या अंतःकरणांत अद्यापि जातिवंत राजनिष्ठाच वसत आहे. इंग्लिशांची राजनिष्ठा ही वरकरणी किंवा मायावी आहे. अशा स्थितींत आपल्या लोकांना शुद्ध लोकशाहीचाच उपदेश आपण करणें इष्ट आहे. इग्लिशांची मूर्तिपूजा किंवा पुराणप्रियता त्यांच्या प्रगतीस मारक न बनतां तारक बनली आहे. उलट, आमची मूर्तिपूजा व पुराणप्रियता आम्हांला मारक बनली असून ती आमच्या प्रगतीच्या मार्गांत अडथळा करीत आहे. या मूर्तिपूजेमुळें व पुराणप्रियतेमुळे आमच्या राष्ट्राला आज प्रेतकळा आलेली आहे. सारांश, आम्हांला आमच्या देशांतील राजघराण्यांचा भार यापुढें केवळ उपचार म्हणूनहि सहन करणें शक्य व हितावह वाटत नाहीं, हें कठोर सत्य आम्ही आता उघडपणें प्रतिपादन करण्यास प्रारंभ केला पाहिजे. हाच न्याय ब्रिटिश राजपदासहि लागू पडतो. हिंदुस्थान देश ब्रिटिश राष्ट्रसंघाशीं सख्य करून राहिला, तरी आपल्या गुलामगिरीचें चिह्न चिरंतन करण्यास तो तयार नाहीं हें आपण जाहीर केलें पाहिजे. भरतखंडानें ब्रिटिश राष्ट्रसंघाशीं सख्य केल्यास तो एक भारत-ब्रिटिश राष्ट्रसंघ (Indo-British Commonwealth) होईल व त्यांपैकीं भारतवर्षाचें आधिपत्य लोकनियुक्त राष्ट्राध्यक्षाकडेच राहील. आनुवंशिक राजपदाच्या तत्त्वाला अभिमानानें कवटाळण्यास भारतीयांचा इतिहास प्रोत्साहन देत नाहीं. मग बोलूनचालून परकीय राजघराण्याशी यावच्चंद्रदिवाकरौ एकनिष्ठ राहण्याचें तत्त्व भारतीय जनता कशी व कां मान्य करील ?

या संस्थानिक वर्गाप्रमाणेंच जमीनदार, इनामदार व कारखानदार या वर्गांची आज समाजाला उपयुक्तता उरलेली नाही. समाजाला अनुपयुक्त झालेल्या वर्गालाहि पिढ्यान्‌पिढ्या पोसण्याचें तत्त्व एकदां संस्थानिक-वर्गाच्या बाबतींत आपण मान्य केलें म्हणजे जमीनदार, इनामदार व कारखानदार या वर्गाच्या बाबतींतहि तें स्वीकारणें अवश्य होऊन बहुजनसमाजाची उन्नति करण्यास

आपणाला मुळींच अवसर मिळणार नाहीं. कोणाहि सुदृढ व प्रौढ व्यक्तीस शारीरिक किंवा बौद्धिक श्रम केल्याखेरीज योगक्षेम चालवितां येण्याचा हक्क प्राप्त होतां कामा नये, हें तत्त्व आपण सर्वत्र लागू केलें पाहिजे. समाजसत्तावादाचें हें एक मूलभूत तत्त्व आहे. औद्योगिक क्षेत्रात उपभोग्य संपत्ति निर्माण करण्याचीं साधनें–म्हणजे जमिनी व कारखाने ही साधनसंपत्ति–ज्यांच्या मालकीचीं असतात, त्यांना केवळ आपल्या स्वामित्वाच्या हक्कांबद्दल मिळणाऱ्या मोबदल्यांतून पिढ्यान्‌पिढ्या निरुद्योगी राहून प्रतिष्ठेनें योगक्षेम चालवितां येतो; आणि या निरुद्योगी सुखवस्तु वर्गाच्या हाती हल्लीच्या समाजांतील बहुजनसंख्येची जीवितसाधनें गेल्यामुळें या वर्गाचें आर्थिक दास्य बहुजनसमाजाला करावें लागतें. हें आर्थिक दास्य नष्ट झाल्याशिवाय सामाजिक, आर्थिक किंवा राजकीय असें कोणत्याहि प्रकारचे स्वातंत्र्य लोकांना उपभोगतां येणार नाही. शरीर हें ज्याप्रमाणें सर्व मानव-व्यवहाराचें आद्य साधन आहे, त्याचप्रमाणे आर्थिक स्वातंत्र्य हाच सर्व प्रकारच्या भौतिक, बौद्धिक किंवा आध्यात्मिक स्वातंत्र्याचा आधार आहे. जोंपर्यंत आम्ही बहुजनसमाजाला आपल्या पायांतील आर्थिक दास्याच्या शृंखला तोडण्यास उद्युक्त करीत नाहीं, तोंपर्यंत त्याची सुस्थिति परराज्याप्रमाणें स्वराज्यांतहि होणें शक्य नाहीं.

‘ समाजसत्ताक लोकशाही ’ या शब्दांचा अर्थ आतां वाचकांच्या ध्यानांत आला असेल, अशी आशा आहे. समाजाचें सर्वांगीण स्वातंत्र्य आणि राजकीय व आर्थिक लोकसत्ता यांचा त्यांत अंतर्भाव होतो. राष्ट्रांतील संस्थानिक, जमीनदार, कारखानदार व सावकार हे वर्ग अजिबात नष्ट करून संस्थानें, जमिनी, कारखाने व पेढ्या या सर्वांवर लोकांची सत्ता स्थापन करावयाची आणि हे सर्व व्यवहार समाजांतील बहुजनसंख्येचे सुख व स्वातंत्र्य यांची वृद्धि होईल अशा प्रकारें चालू ठेवावयाचे हाच समाजसत्ताक लोकशाहीचा व्यावहारिक अर्थ आहे.

**विवेकयुगाची घोषणा**:—एवढी मोठी सामाजिक, आर्थिक व राजकीय क्रांति घडवून आणावयाची म्हणजे सामान्य जनतेंतील अंधश्रद्धा व पुराणप्रियता नष्ट होणें अवश्य आहे. कुटुंब, जात, वर्ग, राष्ट्र, धंदा, धन, धर्म यांसंबंधींचे आमचे सर्व व्यवहार केवळ परंपरागत रूढीप्रमाणें अंधश्रद्धेनें चालू आहेत. आमच्या बुद्धीला लागलेलें हें अंधश्रद्धेचें ग्रहण सुटून आमचा विवेकसूर्य पूर्ण प्रकाशानें तळपूं लागल्याखेरीज सामान्य जनतेच्या हातून एवढी मोठी क्रांति

होणार नाही. आमचे बहुतेक सामाजिक व आर्थिक व्यवहारच नव्हेत, तर राजकीय व्यवहारहि एक प्रकारच्या धर्मभावनेवर उभारलेले आहेत. हा धर्म सनातन असून त्यानें लावून दिलेलीं परंपरागत कर्तव्यें ईश्वरप्रणीत आहेत व त्यांत फिरवा-फिरव किंवा सुधारणा करण्याचा आम्हां मानवांना अधिकार नाही अशी कल्पना सामान्य जनतेच्या अंतःकरणांत खोल रुजलेली आहे. ही कल्पना निर्मूल करून राजा व प्रजा, सरकार व कुळें, जमीनदार व शेतकरी, कारखानदार व कामकरी, ब्राह्मण व शूद्र, पति व पत्नी, आईबाप व मुले याच्यांतील संबंध व तज्जन्य सर्व संस्था, रूढी किंवा कायदे या सर्वांना विवेकाच्या निकषावर घासून किंवा विवेकाच्या अग्नीत झाळून पाहण्याचा हक्क प्रत्येक पिढींतील लोकांना आहे याची जाणीव जनतेला करून दिली पाहिजे. तसेंच मनुष्यानें आपल्या बुद्धिप्रकर्षानें आज निसर्गाच्या दास्यशृंखला तोडून टाकून आपल्या उन्नतीस होणारा निसर्गाचा विरोध नष्ट केला असून मानवी दास्याला व कष्टांना आज नैसर्गिक कारणें उरलेली नाहींत, हा सिद्धांतहि जनतेला पटवून दिला पाहिजे. मनुष्यसमाजांतील प्रत्येक व्यक्तीचा योगक्षेम व जीवितयात्रा अनायासें होऊन प्रत्येक व्यक्तीस आपली बौद्धिक, नैतिक व आध्यात्मिक उन्नति करून घेऊन सत्यसंशोधन, सौंदर्यसंवर्धन व समाजसेवा करण्यास अवश्य ती विश्रांति मिळेल इतकी सामाजिक सुधारणा करणें आज शक्य आहे. आज अशी स्पृहणीय अवस्था मानव-समाजास प्राप्त होत नसली आणि प्रत्येक राष्ट्रांतील सामान्य जनतेस दारिद्र्य, अज्ञान, अनारोग्य व अनीति यांच्या कर्दमांत लोळावें लागत असलें, तर त्याचें कारण निसर्गाचा विरोध, देवाचा प्रकोप किंवा दैवाची गति यांपैकी एकहि नसून अन्याय आणि विषमता यांच्या पायावर उभारलेल्या सामाजिक, आर्थिक व राज-कीय संस्था याच आहेत आणि सामान्य जनता मनांत आणील तर या सर्व अन्यायांतून व विपत्तींतून तिला आपली मुक्तता करून घेतां येईल, हा आत्म-विश्वास किंवा आपल्या विवेकशक्तीवरील विश्वास जनतेंत वाढला पाहिजे. श्रीमंत व गरीब, स्पृश्य व अस्पृश्य, स्त्री व पुरुष यांच्या सुखांत, स्वातंत्र्यांत व ज्ञानांत जें अंतर आढळतें, तें सर्व नष्ट करून समतेची प्रस्थापना करणें शक्य आहे. यांत पूर्वजन्म, पुनर्जन्म, देव किंवा दैव यांचा कांहींएक संबंध नाहीं. एका राष्ट्रांतील बालमृत्यूंची संख्या दुसऱ्या राष्ट्रांतील त्याच संख्येहून अधिक कां? एका राष्ट्रांतील आयुर्मान दुसऱ्या राष्ट्राहून कमी किंवा अधिक कां आहे? कांहीं लोकांना मोडक्या खोपटांत

जन्म येऊन खोपटांतच मरावें कां लागतें व दुसऱ्या कांहींना वाड्यांत जन्म येऊन वाड्यांतच मृत्यु कां येतो? कांहींना आजन्म उन्हातान्हांत काबाडकष्ट करूनहि पोटभर अन्न, अंगभर वस्त्र किंवा निवाऱ्याची जागा कां मिळत नाहीं व कांहींना अल्प श्रमानें किंवा बिनश्रमानें या सर्व बाबतींत चैनीनें कालक्रमणा कशी करतां येते? कांहींना बुद्धि नसून शिक्षणाप्रीत्यर्थ शेंकडों रुपये उडवितां कसे येतात व कांहींना बुद्धि असूनहि शिक्षणाची संधि कां मिळत नाही? कांहींना आपणांस व आपल्या मुलाबाळांस साध्या पडशाखोकल्यावरहि लगेच औषधोपचार करतां येतो व कांहींना प्राणांतिक आजाराच्या वेळीहि वैद्यकीय मदत कां मिळत नाहीं? कांहींना आपल्या कुटुंबियांची सर्व जन्माची चोख व्यवस्था लावून मरतां येतें, तर कांहींना त्यांना वाऱ्यावर सोडून मृत्युवश कां व्हावें लागतें? या सर्व प्रश्नांचा विचार शुद्ध विवेकाच्या साहाय्यानें केल्यास प्रस्तुत सर्व आपत्ती सामाजिक व राजकीय अन्यायांतून व विषमतेंतून निर्माण होतात, असें दिसून येणार आहे. सामान्य जनतेचें लक्ष अद्यापि ऐहिक उन्नतीकडे लागलेलेंच नाही. आपल्या सर्व आपत्तीच्या कारणांची मुळें त्यांना पूर्वजन्माच्या अज्ञात क्षेत्रांत रुजलेलीं दिसत असून त्यांची उपभोगलालसा मरणोत्तर प्राप्त होणाऱ्या स्वर्गीय सुखाशीं निगडित झालेली आहे. सामाजिक अन्यायाच्या व विषमतेच्या नरकांतून निघून न्यायाच्या व समतेच्या राज्याची प्रस्थापना करणे हाच स्वर्ग होय, हें जनतेला समजावून दिलें पाहिजे तसेंच वैयक्तिक स्वार्थ सोडून समाजसेवेंत आनंद मानणें हाच खरा मोक्ष आहे, असें लोकांना वाटूं लागलें पाहिजे.

**जनतेची संघटना व प्रत्यक्ष प्रतिकारः**—आतां हें ध्येय साध्य कसें करावे यासंबंधीं थोडें विवेचन केलें पाहिजे. सामान्य जनतेचें स्वातंत्र्य हें स्वतः सामान्य जनतेनेंच मिळविलें पाहिजे व टिकविलें पाहिजे, हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. केवळ बौद्धिक जागृति झाल्यानें जनता आपल्या दास्यांतून व दैन्यांतून मुक्त होईल ही आशा व्यर्थ आहे. तसेंच राजकीय लोकसत्तेची प्रस्थापना होऊन प्रत्येक प्रौढ व्यक्तीला मताधिकार मिळाल्यानेंहि जनतेचें सामाजिक व आर्थिक दास्य नष्ट होऊं शकत नाही, असा अनुभव इंग्लंडादि युरोपीय देशांच्या इतिहासावरून आलेला आहे. जोंपर्यंत समाजांत कांही लोकांना केवळ स्वामित्वावर उपजीविका करितां येत आहे आणि या परोपजीवी वर्गाच्या हातीं श्रमोपजीवी अशा बहुजनसमाजाचीं जीवितसाधनें आहेत, तोंपर्यंत जनतेचें दैन्य व दास्य

यांचा विनाश होत नाहीं. हें खरें असल्यास या परोपजीवी वर्गाच्या हातून बहु-जनसमाजाचीं जीवितसाधनें म्हणजे राष्ट्रांतील साधनसंपत्ति—जमिनी व कार-खाने—काढून घेऊन ती सार्वजनिक मालकीचीं करण्यास हल्लींच्या प्रातिनिधिक राजकीय संस्था असमर्थ आहेत, असा गेल्या बारा वर्षांचा युरोपीय इतिहास स्पष्ट साक्ष देत आहे. समाजसत्तेचे ध्येय मान्य करणाऱ्या मजूर पुढाऱ्यांचें बहुमत आज इंग्लंड, जर्मनीसारख्या युरोपीय देशांतील लोकसभांत होऊन हे पक्ष आपल्या देशांत मंत्रिपदारूढहि झाले आहेत, पण एकट्या रशियाखेरीज अद्यापि कोणत्याहि देशाची समाजसत्तेच्या ध्येयाकडे निश्चित प्रगति होत असल्याचे दिसत नाहीं. यावरून केवळ आपले प्रतिनिधी लोकसभांत पाठवून समाजसत्ताक क्रांति करणें अगदीं अशक्य नसले, तरी अल्पकाळांत तरी असंभवनीय आहे, असा अनुभव इंग्लंडादि युरोपीय देशांतील जनतेला आलेला आहे किंवा येऊं लागला आहे आहे ही समाजपद्धति कायम ठेवून तीत कांहीं विशिष्ट सुधारणा घडवून आणणे या मार्गानें शक्य आहे; परतु समाजसत्ताक पद्धति प्रस्थापित करण्यास हा मार्ग अपुरा आहे, असे इंग्लंडांतील स्वतंत्र मजूरपक्षाचे एक प्रमुख पुढारी मि. ब्रेल्स्फोर्ड यांनाहि कबूल करावे लागले आहें. ते म्हणतातः—" ( समाजसत्ता प्रस्थापित करण्यास ) केवळ राजकीय सत्ता हस्तगत करणे पुरेसे होणार नाहीं. पार्लमेंटांतील पक्षाच्या पाठीमागें मजूरसंघांनी संघटित केलेली औद्योगिक कामगाराची सेना उभी असली पाहिजे. अखेरीस सध्यांची सांपत्तिक विभागणी व सत्तेची विभागणी सहन करण्यास खाणींतील व कारखान्यांतील कामकरी अधिकाधिक नाखुष होत आहेत हाच युक्तिवाद ही मूलभूत सुधारणा घडवून आणण्यास बिनतोड ठरणार आहे."[1] तात्पर्य, देशांतील कामगारवर्गानें सध्यांचें अन्याय्य समाजयंत्र यापुढें चालू देण्यास आम्ही तयार नाहीं असे स्पष्टपणें जाहीर केल्याखेरीज केवळ लोकसभेंत आपले प्रतिनिधी

---

1 " Nor will Political power alone suffice Behind the parliamentary party must stand the industrial army organised in trade-unions In the end, the unanswerable argument for fundamental change will be the increasing reluctance of the organised workers in mine and factory to tolerate the present distribution of wealth and power."

Socialism for Today, p. 67

पाठवून कायद्यानें प्रस्तुत सामाजिक अवस्थांतर घडवून आणणें शक्य नाही, हें मजूरपक्षांतील निदान नव्या पिढीस तरी आज पटू लागले आहे. अर्थात् प्रस्तुत राज्ययंत्र व समाजयंत्र जनतेनें प्रत्यक्ष प्रतिकारा (Direct Action) नें बंद पाडले तरच समाजसत्ताक समाजयंत्र निर्माण होऊं शकेल असें म्हणावें लागतें.

सर्व जनतेनें संघटित होऊन प्रचलित समाजयंत्राचा व राज्ययंत्राचा हा जो प्रत्यक्ष प्रतिकार करावयाचा तो कोणत्या स्वरूपाचा असावा याबद्दलहि आपण निश्चित मत बनविणें अवश्य आहे. औद्योगिक प्रगतीत पुढारलेल्या देशांत सार्वत्रिक संप (General Strike) हा एक प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग असून १९२६ साली इंग्लंडांतील जनतेने संघटित होऊन कोळशांच्या खाणींतील मजुरांच्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याच्या कामी या मार्गाचा अवलंब एकदोन आठवडे करूनहि पाहिला होता; परंतु इंग्लंडांतील अधिकारारूढ पक्षानें हा सार्वत्रिक संपाचा मार्ग बेकायदेशीर व बेसनदशीर ठरविला आणि ‘बेकायदेशीर’ व ‘बेसनदशीर’ या शब्दांना बुजणाऱ्या मजूर–पुढाऱ्यांनीं घाबरून जाऊन इंग्लिश भांडवलशाहीविरुद्ध सोडलेला हा रामबाण पुनः आपल्या भात्यांत घातला व शरणागति स्वीकारली! यानंतर राजकीय किंवा सामाजिक क्रांति घडवून आणणारे सार्वत्रिक संप बेसनदशीर व बेकायदेशीर ठरविणारा कायदाहि इंग्लंडांतील भांडवलशाहीनें मंजूर करून घेतला! असे कायदे आज सर्व युरोपीय देशांत होत असून आमच्या देशांतील नोकरशाहीनें या कामीं सर्वांत आघाडी मारली आहे. अर्थात् कायदेशीर व सनदशीर मार्गांच्या कक्षेंत राहून प्रचलित राज्ययंत्राला किंवा समाजयंत्राला विरोध करणें आज जनतेला अशक्य झालें आहे. हें करणें झाल्यास कायदेभंगाचा अवलंब करण्याखेरीज गत्यंतर नाहीं. इंग्लिश जनतेला व तिच्या पुढाऱ्यांना अद्यापि कायदेभंगाचें तत्त्वज्ञान पटत नाहीं. कायदेभंगाचें पर्यवसान नेहमीं सशस्त्र क्रांतीतच होत असतें व सशस्त्र क्रांति झाल्यास आपल्या संस्कृतीचा व राष्ट्रीय जीवनाचाहि विनाश होईल, अशी भीति इंग्लिश मजूर–पक्षांतील पुढाऱ्यांसदेखील वाटते! अर्थात् वर सांगितलेल्या परिस्थितींत सार्वत्रिक संपाचें ब्रह्मास्त्र आवरून घेऊन प्रतिपक्षाला शरण जाण्याखेरीज त्यांना इतर कोणताहि मार्ग दिसला नाहीं हे साहजिकच आहे.

म. गांधींसारखा शांततेच्या कायदेभंगाचें तत्त्वज्ञान शोधून काढणारा पुढारी

१९२६ सालीं इंग्रज जनतेला लाभला असता, तर असा नामुष्कीचा प्रकार तिला सहन करावा न लागता आणि आपल्या सत्याग्रहाच्या जोरावर आपलें म्हणणें तिनें ब्रिटिश भांडवलशाहीस मान्य करावयास खास लावले असतें, असा आम्हांस भरंवसा वाटतो. प्रचलित राजयंत्राचा प्रत्यक्ष प्रतिकार करण्याला सामान्य जनतेस उद्युक्त करण्याचे कार्य ज्यांनीं स्वीकारले त्यांनीं आपण हें कार्य कायद्यांच्या कक्षेंत राहून करू शकूं ही आशा सोडून दिली पाहिजे. सामुदायिक कायदेभंग व सार्वत्रिक करबंदी याचा अवलंब केल्याखेरीज प्रचलित राज्ययंत्र बंद पाडण्याची अपेक्षा सफल होणार नाही. जी गोष्ट १९२६ सालीं इंग्लडांतील मजूर–पुढाऱ्यांना करतां आली नाही, ती १९३० साली म. गांधींनी हिंदुस्थानांत करून दाखविली आहे. म्हणजे जनतेच्या प्रत्यक्ष प्रतिकारापुढें त्यांनीं देशांतील राज्यसूत्रधारांना आज वांकविलें आहे, व ह्या कामी ते अखेरपर्यंत सर्वस्वी यशस्वी न होतां बहुतांशीं जरी यशस्वी झाले, तरीहि त्यांनीं प्रत्यक्ष प्रतिकाराच्या मार्गांत सर्व जगाच्या पुढें एक पाऊल टाकलें, असे खात्रीनें सिद्ध होणार आहे. किंबहुना, सामुदायिक कायदेभंग व सार्वत्रिक करबंदी यांचा शांततेनें अवलंब करून निःशस्त्र राज्यक्रांति घडवून आणण्याचे धडे जगाला घालून देणें हेच म. गांधींचें जीवितकार्य आहे.

म. गांधींनी निःशस्त्र क्रांतीचें जे एक नवें साधन शोधून काढिलें आहे, त्याचा उपयोग समाजसत्ताक क्रांति करण्याच्या कामीं सर्व जगाला होणार आहे; व याच दृष्टीनें पाश्चात्य देशांतील विचारी लोकांचे लक्ष आज त्यांच्या शांततायुद्धाकडे लागलें आहे यांत शंका नाहीं. औद्योगिक संस्कृतीमुळें आज प्रत्येक युरोपीय राष्ट्रांत व अमेरिकेंत परोपजीवी भांडवलवाले व श्रमोपजीवी कामगार याच्यांत एकप्रकारचें वर्गयुद्ध सारखें चालू असतें आणि या युद्धाचा अंत समाजसत्ताकपद्धति रूढ झाल्याखेरीज होणें अशक्य आहे असेंहि पुष्कळांना पटलेलें आहे. पण एवढी मोठी क्रांति घडवून कशी आणावी हा मोठा कूट प्रश्न तेथील विचारी लोकांपुढें येऊन पडलेला आहे. रशियांतील कम्युनिस्ट लोकांचें या कूट प्रश्नाला उत्तर अगदीं सोपें आणि सरळ आहे. तें असें कीं, पाश्चात्य भांडवलप्रधान राष्ट्रें साम्राज्यवृद्धीसाठीं भांडतां भांडतां एक मोठें जागतिक महायुद्ध निर्माण होईल; आणि या जागतिक महायुद्धाच्या प्रसंगीं प्रत्येक देशांत सशस्त्र क्रांति होऊन समाजसत्तेची प्रस्थापना होईल. याकरितां सर्व देशांतील समाजसत्तावाद्यांनी आपापल्या देशांतील कामकरी व शेतकरी वर्गाची या दृष्टीनें संघटना करीत राहून या भावी

जागतिक राज्यक्रांतीला त्यांना सज्ज करून ठेवावें. रशियांत झाली त्या प्रकारची समाजसत्ताक राज्यक्रांति जागतिक महायुद्धाच्या संधीशिवाय कोणत्याहि देशात होऊं शकत नाही, हेंहि गेल्या दहाबारा वर्षांच्या अनुभवानें त्यांना पटूं लागलें आहे. पण प्रत्येक देशांत ज्या मानानें हें समाजसत्ताक क्रांतीचें भय वाढत आहे, त्या मानानें साम्राज्यवादी भांडवलप्रधान राष्ट्रांतील सूत्रधार हें जागतिक युद्ध टाळण्याचा किंवा पुढे ढकलण्याचा शक्य तो उपाय योजीत आहेत. यामुळें सशस्त्र क्रांतिवादी समाजसत्ताक पक्षाला अनुकूल असणारी जागतिक महायुद्धाची संधी सध्यां तरी प्राप्त होऊं शकत नाही

शिवाय, या जागतिक महायुद्धांत आणि जागतिक क्रांतींत होणाऱ्या मनुष्य-हानीचें व धनहानीचें भीषण स्वरूप मनश्चक्षूंपुढें उभें राहिलें, म्हणजे कोणाहि विचारी मनुष्याच्या अंतःकरणात उद्विग्नतेचें आणि निराशेचें साम्राज्य पसरल्याखेरीज रहात नाही, व एवढ्या भयंकर मनुष्यसंहारानंतर व धनहानीनतर मानव–संस्कृति म्हणून कांहीं शिल्लक उरूं शकेल किंवा नाही याबद्दल शंका वाटूं लागते अर्थात् मानव–संस्कृतीवरील व मानव–समाजाच्या अस्तित्वावरील हे भयंकर संकट टाळून जगांत न्यायाची, शांततेची व समतेची प्रस्थापना करण्याचा कांही उपाय निघाल्यास तो शोधून काढण्याकडे सर्व दूरदर्शी व मानवहितदक्ष थोर विभूतींचे आज लक्ष लागलेलें आहे. भांडवलशाही, लष्करशाही व साम्राज्यशाही यांतून निश्चितपणे उद्भवणाऱ्या या भावी जागतिक महायुद्धांतून व जागतिक सशस्त्र क्रांतींतून मनुष्यजातीला सोडविण्याचें सामर्थ्य सामान्य जनतेच्या संघटित शांततामय प्रत्यक्ष प्रतिकारांत आहे असें आम्हांस वाटतें. भांडवलशाही लष्करशाही व साम्राज्यशाही या सर्वांच्या सुलतानी व सैतानी जुलुमाचें अस्तित्व जगांतील कामकरी व शेतकरी लोकांच्या सहकारितेवर व सहनशीलतेवर अवलंबून आहे हें कोणासहि विचाराअंतीं दिसून येण्यासारखें आहे. कोणत्याहि राष्ट्रांतील कामकरी व शेतकरी वर्ग हा आपल्यावर जुलूम करून आपल्या श्रमावर जगणारी जी परोपजीवी भांडवलशाही, लष्करशाही व साम्राज्यशाही तिला आपण सहाय्य करणार नाही असा निर्धार करील आणि सार्वजनिक कायदेभंग व करबंदी ह्या शस्त्रांनीं शांततेची क्रांति करून समाजसत्ता व विश्वकुटुंब ( Socialism and Communism ) यांची प्रस्थापना करण्याचा प्रयत्न करील, तर फार थोड्या

काळांत त्याला यश मिळून मानव-संस्कृतीच्या इतिहासांत एका नव्या युगाचा प्रारंभ होईल यात शंका नाहीं.

**समाजसत्ताक निःशस्त्र क्रांति कशी होईल?**—वर वर्णन केलेली निःशस्त्र क्रांति घडवून आणून सशस्त्र क्रांति व सशस्त्र युद्ध या रानटी उपायांऐवजीं मनुष्यत्वाला साजेल व मानव-संस्कृतीला पुढे नेईल असा मार्ग जनतेला दाखवावयाचा झाल्यास अहिंसावाद व समाजसत्तावाद या दोहोंवर विश्वास असणाऱ्या लोकांनीं एक पक्ष स्थापन करून त्यामार्फत आपल्या देशांतील कामकरी व शेतकरी लोकांचें संघटन करण्याचें कार्य अंगावर घेतलें पाहिजे. आज हें कार्य करीत असणाऱ्या लोकांत सुधारणावादी व सशस्त्र क्रांतिवादी असे दोनच पक्ष आहेत. एकाचा ओढा प्रातिनिधिक संस्था, इंग्लंडांतील मजूरपक्ष, राष्ट्रसंघ व 'सेकंड इंटरनॅशनल्' यांकडे आहे, तर दुसऱ्याचा ओढा मॉस्को येथील 'थर्ड इंटरनॅशनल्'कडे आहे.

गांधींचा निःशस्त्र क्रांतिकारक पक्ष अद्यापि समाजसत्ताक ध्येय स्वीकारून कामकरी व शेतकरी वर्गाची संघटना करण्यास पुढे येत नाही. या पक्षापैकीं पुष्कळांना औद्योगिक संस्कृतीची आवश्यकताच वाटत नाही, किंबहुना, सर्व यांत्रिक औद्योगिक संस्कृति ही मानव-संस्कृतीवर एक आपत्ति आलेली आहे अशी त्यांची कल्पना दिसते. पण आधुनिक औद्योगिक संस्कृति ही अनिष्ट नसून तिच्यावर ज्या धनिक वर्गाचा पगडा बसला आहे तो अनिष्ट आहे व तिचीं सर्व सूत्रें सर्व समाजाच्या हातीं दिल्यास तिचें अनिष्ट स्वरूप नष्ट होऊन तिला मंगल स्वरूप प्राप्त होईल, अशी समाजसत्ताक पक्षाची श्रद्धा आहे अर्थात् समाजसत्तेचें ध्येय आणि निःशस्त्र प्रत्यक्ष प्रतिकारा (non-violent direct action)चें साधन या दोहोंवर ज्याची निष्ठा आहे अशा लोकांचा एक पक्ष आतां हिंदुस्थानांत अस्तित्वांत येणें आवश्यक व अपरिहार्यहि दिसतें. कामकरी व शेतकरी वर्गामार्फत सावकार, जमीनदार, कारखानदार व सरकार यांचा जो प्रत्यक्ष प्रतिकार करावयाचा तो सध्यां धोरण या दृष्टीनें निःशस्त्र किंवा अनत्याचारी असावा असें म्हणणारे आज पुष्कळ लोक आहेत; पण आपण अखेरपर्यंत शांततेच्या मार्गासच चिकटून राहूं असे म्हणणारे लोक कामकरी व शेतकरी वर्गाच्या संघटनेंत फारसे आढळणार नाहींत. परंतु यापुढें जगांत भांडवलशाही, लष्करशाही व साम्राज्यशाही आम्ही चालूं देणार नाही असें मानणारा, पण कोणत्याहि परिस्थितींत सशस्त्र क्रांतीचा अवलंब न करणारा असा पक्ष निर्माण झाल्याखेरीज हा निःशस्त्र क्रांतीचा प्रयोग

यशस्वी होणार नाहीं. म. गांधींनीं हिंदी स्वराज्याच्या चळवळींत प्रवेश केला त्यावेळीं त्या चळवळीची जी स्थिति होती, तीच स्थिति आज समाजसत्ताक चळवळीला हिंदुस्थानांत व इतर देशांत प्राप्त झालेली आहे. केवळ सनदशीर व कायदेशीर चळवळीनें इष्टफलप्राप्ति होत नाहीं आणि सशस्त्र क्रांतिहि शक्य दिसत नाहीं. या परिस्थितींतून म. गांधींनीं आपल्या सत्याग्रहाच्या तत्त्वाचा अवलंब करून जसा स्वराज्याच्या चळवळींत पुढे मार्ग काढिला, तसाच मार्ग सर्व जगांतील समाजसत्तावाद्यांनीं आज काढला पाहिजे.

म. गांधीचे सत्याग्रहाचें तत्त्व ज्यांना पटलें आहे, परंतु औद्योगिक संस्कृति ही केवळ आसुरी मानून तिचा सर्वस्वीं त्याग करणें ज्यांना शक्य व इष्ट वाटत नाहीं, त्यांनीं या कामीं पुढाकार घेतला पाहिजे. तसेंच कामकरी व शेतकरी लोकांची ही संघटना प्रथमपासूनच द्वेषभावनेपासून अलिप्त ठेविली पाहिजे. आपला लढा संस्थानिक, जमीनदार व कारखानदार या वर्गांतील व्यक्ती-विरुद्ध नसून त्या त्या सामाजिक संस्थांविरुद्ध आहे; आणि हे सर्व वर्ग नष्ट करावयाचे याचा अर्थ त्यांतील व्यक्तींना मारून टाकावयाचें हा नसून त्यांचें फक्त परोपजीवन नष्ट करून त्यांना श्रमोपजीवी बनवावयाचें एवढाच आहे, हें प्रथमपासून जनतेला स्पष्ट करून सांगितलें पाहिजे. अर्थात् कामकरी व शेतकरी वर्गाची संघटना करून त्यांना असहकारिता, कायदेभंग व करबंदी किंवा खंडबंदी यांचें शिक्षण देत असतांनाच आपली परोपजीवी वृत्ति हें पाप आहे व ती सोडून देऊन स्वतः श्रमोपजीवी बनणें हें आपले कर्तव्य आहे, या भावनेची जाणीव कारखानदार, जमीनदार व सावकार या लोकांत निर्माण करण्याबद्दलहि प्रयत्न केले पाहिजेत. याशिवाय समाजांतील मध्यम वर्गाचीहि सहानुभूति मिळवून घेऊन समाजसत्ताक अवस्था मानव-संस्कृतीच्या व प्रगतीच्या दृष्टीनें कशी अपरिहार्य व आवश्यक आहे याबद्दल अनेक दिशांनीं प्रयत्न करून लोकमत अनुकूल करून घेतलें पाहिजे. इतकेंच नाहीं, तर सध्यांच्या भांडवलप्रधान संस्कृतींतून समाजसत्ताक संस्कृतींत जातांना कांहीं संक्रमणावस्थेस आवश्यक अशा तडजोडी-सुद्धां कराव्या लागतील, हें या शांततावादी पक्षानें नेहमीं ध्यानांत बाळगिलें पाहिजे. सशस्त्र क्रांतिकारकांनाहि अशा तडजोडी कराव्या लागतात, हें रशियाच्या इतिहासावरून दाखवून देतां येण्यासारखें आहे. तात्पर्य, हल्लींच्या भांडवलप्रधान समाजाला श्रमप्रधान स्वरूप देण्याचें कार्य क्रांतीखेरीज होणार नाहीं हें खरे असलें,

तरी ही क्रांति सशस्त्रच झाली पाहिजे व तींत अगणित मनुष्यसंहार व अनंत धनहानि झालीच पाहिजे, म्हणजे, हें अपरिहार्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. बहुजनसमाजानें अहिंसेच्या मार्गानें हें घडवून आणण्याचा निर्धार करून त्याकरतां वाटेल तो स्वार्थत्याग करावयाचें ठरविल्यास तें अगदीं शक्य आहे. या बाबतींत "शास्त्रीय समाजसत्तावादाचीं मूलभूत तत्त्वें" या पुस्तकांत अमेरिकेंतील एक ग्रंथकार मि. ए. एस्. सॅक्स् हे पुढीलप्रमाणें लिहितातः– "मार्क्सनें कल्पिलेली समाजक्रांति रक्तपातानेंच किंवा कोणत्याहि स्वरूपाच्या अत्याचारानेंच घडून येणें अपरिहार्य आहे असें नाहीं एका वर्गाच्या हातांतील सत्ता दुसऱ्या वर्गाच्या हातीं जाणें किंवा एक समाजस्थिति पालटून दुसरी प्रस्थापित होणें, हें जें संक्रमण तोच सामाजिक क्रांति या शब्दाचा अर्थ आहे. अत्याचारी मार्गानें हें संक्रमण घडवून आणणें जितकें सुसाध्य आहे, तितकेंच तें पूर्णपणें शांततेनेंहि घडवून आणणें शक्य आहे. या संक्रमणावस्थेंत काय काय गोष्टी घडतील हें अनेक परस्परावलंबी गोष्टींवर अवलंबून आहे. उदाहरणार्थ, ज्या वर्गानें आपली सत्ता सोडावी अशी आपली अपेक्षा आहे, त्याच्या कृती कशा आहेत, तसेंच जो वर्ग सत्ता संपादन करूं पाहत आहे, त्याची आर्थिक स्थिति व मानसिक वृत्ति कशी आहे, या व यासारख्या अनेक गोष्टींवर हें अवलंबून आहे."[१] तेव्हां समाजसत्ताक क्रांति

१. "The Social Revolution as conceived by Marx does not necessarily imply blood-shed or the employment of violence in any form. The term simply describes the process of change from one social system to another, the transfer of political power from one class to another. This transition may be brought about in a thoroughly peaceful manner, just as readily as by violent means. The accompanying phenomena of this transitional event depend largely upon several closely related circumstances; such as the actions of the class that is expected to surrender the power, as well as upon the economic and mental state of the class that is seeding to acquire that power, and other similar conditions."

—Basic Principles of Scientific Socialism, P. 180

रक्तपातानेंच झाली पाहिजे हें मत जर बरोबर नसेल, तर ती बिनरक्तपातानेंच आपण घडवून आणूं असें प्रतिज्ञाकंकण हातास बांधून तें कार्य करण्यास पुढें येणारा एक पक्ष निघणे अवश्य नाहीं काय ?

शिवाय, हें कार्य सामान्य जनतेच्या निःशस्त्र प्रतिकारानें घडवून आणिल्यास दुसरा एक फायदा होणार आहे. सशस्त्र क्रांतीनंतर कांहीं काळ तरी एका अल्प-संख्याक वर्गाचा सत्तेचा अंमल सर्व जनतेला सहन करावा लागतो आणि तो काळ संपेपर्यंत लोकसत्ता व भाषणस्वातंत्र्य किंवा मुद्रणस्वातंत्र्य यांचा लोप होतो. शेतकरी व कामकरी वर्गाच्या निःशस्त्र अशा प्रत्यक्ष प्रतिकारांतून समाजसत्ता प्रस्थापित झाल्यास ही आपत्ति टळून पूर्ण लोकसत्ताक वातावरणांत जनतेला वावरतां येईल व सर्व समाजसत्तावाद्यांना अभिप्रेत अशी जी अराजक विश्व-कुटुंबाची सामाजिक अवस्था त्या दिशेनें मानवसमाजाची प्रगति अत्यंत वेगानें होऊं लागेल. अर्थात् भांडवलशाहीबरोबरच लष्करशाहीचाहि लोप होऊन सर्वत्र शांतियुगाच्या छायेंत मानव-संस्कृतीची अमर्याद वाढ होऊ शकेल.

लोकशिक्षण :<br>
जुलै, १९३१

# 'गीतारहस्यां'तील नीतिशास्त्र : : ६

## 'गीतारहस्यां'तील प्रतिपक्षी कोण ?

कोणत्याहि थोर पुरुषांच्या चरित्राचा आणि कर्तृत्वाचा पुरा उलगडा होऊन त्याच्या कार्याचें महत्त्व बरोबर लक्षांत येण्यास त्याच्या वेळच्या परिस्थितीचें पूर्ण आकलन प्रथमतः झाले पाहिजे. हा नियम जसा लोकमान्यांच्या राजकारणाला व राजकीय विचारांना लागू आहे, त्याचप्रमाणें तो त्यांच्या तत्त्वज्ञानाला व तात्त्विक विचारांनाहि लागू आहे लोकमान्यांच्या गीतारहस्यांतील तत्त्वज्ञानाचा किंवा नीतिशास्त्राचा विचार करीत असतां त्या वेळचे त्यांचे प्रतिपक्षी कोण होते व त्यांनीं आपल्या विचारांची मांडणी कोणास उद्देशून केलेली आहे हें प्रथम समजून घेतलें पाहिजे. या दृष्टीनें विचार करूं लागले असतां आपणांस असें दिसून येतें कीं, त्या वेळचे त्यांचे मुख्य प्रतिस्पर्धी किंवा प्रतिपक्षी म्हणजे (१) निवृत्तिमार्गी वेदान्ती किंवा अध्यात्मवादी आणि (२) प्रवृत्तिमार्गी जडवादी किंवा भौतिक सुखवादी हे होत. लोकमान्यांना प्रवृत्तिपर अध्यात्मवाद अभिप्रेत होता व तोच त्यांनीं गीतारहस्य ग्रंथांत प्रतिपादिला आहे. एका पक्षास सर्वच संसार आणि व्यवहार हा मायारूप मानून त्यासंबंधी पूर्ण औदासिन्य स्वीकारणारे वेदान्ती आणि दुसऱ्या बाजूस अध्यात्म व वेदान्त हें सर्व मायाजाल मानून तें तोडून टाकण्यास उद्युक्त झालेले आणि आधिभौतिक सुखावरच सर्व नीतिशास्त्राची किंवा सांसारिक अथवा सामाजिक कर्तव्यशास्त्राची इमारत उभारूं इच्छिणारे जडवादी या दोघांचेंहि खंडन गीतारहस्यांत केलेलें आहे.

## नीतिशास्त्राचा मूलभूत सिद्धांत

गीतारहस्यांत अध्यात्मवाद आहे पण तो प्रवृत्तिपर आहे; आणि त्यांत प्रवृत्ति-वाद आहे, पण तो आध्यात्मिक आहे हें नेहमीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. " सर्वांभूतीं एक आत्मा " हा अध्यात्मशास्त्रांतील मूलभूत तात्त्विक सिद्धान्त किंवा अंतिम सत्य. या अंतिम सत्याचा साक्षात्कार हाच जीवमात्रांचा मोक्ष, या मोक्ष-प्राप्तीसाठीं मनुष्याला प्राप्त करून घ्यावी लागणारी आत्मौपम्य समबुद्धि हाच योग आणि या बुद्धियोगावर आरूढ होऊन आत्मौपम्य बुद्धीला आणि आत्मैक्य ज्ञानाला अनुरूप असे घडणारे जे लोकसंग्रहार्थ व्यवहार तीच नीति किंवा नीतिशास्त्र होय, असा थोडक्यांत गीतारहस्यांतील मूलभूत सिद्धांत सांगतां येईल. या नीतिशास्त्रांत समाजधारणेला महत्त्व आहे, पण ही समाजधारणा केवळ अर्थ व काम या दोन पुरुषार्थांपासून होणार नसून धर्म आणि मोक्ष याच्यापासूनच होऊं शकेल, असें या नीतिशास्त्राचें सांगणें आहे. दुसऱ्यासंबंधींची कर्तव्यभावना हीच समाजांचें धारण करणारी धर्मभावना होय व या धर्मभावनेनें मनुष्याच्या अर्थ व काम या भावनांना नियंत्रित व संयमित केलें पाहिजे. समाजांत धर्मभावना जागृत असली म्हणजे प्रत्येक व्यक्तीला दुसऱ्यासंबंधी कर्तव्याची जाणीव राहते. यामुळें समाजाच्या संस्थांत योग्य सुधारणा होत राहून समाजाच्या अर्थ–कामाचा प्रश्नहि सुटतो. पण ही धर्मभावना किंवा कर्तव्यभावना जिवंत राहण्यासहि अखेर सर्व–भूतात्मैक्याचा अनुभव निदान कांहीं व्यक्तींना तरी आलेला असला पाहिजे. हाच मोक्ष हा चवथा पुरुषार्थ आहे व त्याच्या आधारेंच धर्म व नीति यांची बरोबर उपपत्ति लावतां येते. आत्मौपम्य बुद्धि आणि आत्मैक्याचा अनुभव यांपासून प्राप्त होणारे आध्यात्मिक सुख हेंच सर्व सुखांत श्रेष्ठ असून, त्याची प्राप्ति स्वतःस करून घेणें व ती इतरांस करवून देण्यासाठीं प्रयत्न करणें हेंच मनुष्याचें परम कर्तव्य आहे. ही आत्मौपम्य बुद्धि प्राप्त होण्यास मनुष्यानें निष्काम, निर्वैर आणि निर्द्वंद्व झालें पाहिजे आणि हीच अवस्था इतरांस प्राप्त होऊन मनुष्यजातीला पूर्णावस्था प्राप्त करून देण्यासाठीं प्रत्येकानें झटत राहिलें पाहिजे.

## मानवजातीची पूर्णावस्था हें ध्येय

सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, या नीतिशास्त्राचें ध्येय वैयक्तिक मुक्ति किंवा वैयक्तिक पूर्णावस्था याहून अधिक उच्च आहे. मानव-

जातीची पूर्णावस्था हें त्याचें ध्येय आहे व म्हणून व्यक्तीला आत्मज्ञान झाल्या-नंतरहि त्याला कर्तव्य उरतें असें या नीतिशास्त्रांत म्हटलें जातें; पण हें कर्तव्य सामान्य अर्थानें कर्तव्य उरत नाही. कारण जो स्वतः पूर्ण झाला तो इतरांना पूर्ण बनविण्यासाठी खटपट केल्याशिवाय कसा राहील? हा त्याचा स्वभावच बनतो व त्याला 'तूं हे कर्तव्य कर' म्हणून शास्त्र सांगत नाही. कारण तो शास्त्रांचा जनक असतो; शास्त्रांचा गुलाम नसतो. कर्तव्य हाच त्याचा स्वभाव बनल्यामुळें त्याचे बंधन त्याला उरलेले नसतें. त्याच्या आचार-विचारांकडे पाहून इतरांनीं कर्तव्य शिकावयाचे असतें असे पूर्णत्वाप्रत गेलेले लोक दोन प्रकारचे असतात: (१) सांख्य किंवा कर्मसंन्यासी व (२) योगी अर्थात् कर्मयोगाचा आश्रय करणारे. यांपैकी कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ असें गीता सांगते व तेंच युक्ति-दृष्टयाहि बरोबर आहे मनुष्यजातीची पूर्णावस्था हें ध्येय ठरलें म्हणजे व्यक्तिशः मुक्त झालेल्या मनुष्यानें इतरांच्या उद्धाराचे प्रयत्न कां करावेत असा प्रश्नच उरत नाही. एकनाथी भागवत म्हणतें,

"पावोनियां ब्रह्मज्ञान
स्वयें उद्धरिला आपण।
न करी तोचि दीनोद्धरण
हें भंडपण ज्ञात्याचें ॥"

अशा आत्मज्ञानी मनुष्यापुढें समाजाचा उद्धार हा मुख्य प्रश्न असतो व म्हणून तो समाजाच्या सुखवृद्धीचा प्रयत्न करीत असतो. तथापि, सुख या शब्दानें तो केवळ बाह्य इंद्रिय–सुख असा अर्थ घेत नसून बुद्धीची समता व आत्म्याची प्रसन्नता यांपासून प्राप्त होणारें खरें, नित्य, सात्त्विक सुख हेंच श्रेष्ठ मानतो. (तत्सुखं सात्विकं प्रोक्तं आत्मबुद्धिप्रसादजम्) म्हणून समाजाच्या भौतिक सुखांत भर घालावी आणि त्याचीं शारीरिक दुःखें नष्ट करावींत असा जरी तो प्रयत्न करीत असला, तरी केवळ भौतिक सुखांचीं वृद्धि हें त्याचें ध्येय नसून समाजांतील व्यक्तीच्या बुद्धीची समता व आत्मोन्नति इकडे त्याचें मुख्य लक्ष असतें. यासंबंधीं लोकमान्य लिहितातः—

"तसेंच, ज्याची बुद्धि पूर्ण साम्यावस्थेस पोंचली, तो लोकांस केवळ आधि-भौतिक सुख मिळवून देण्यासाठींच आपले सर्व व्यवहार करील हें संभनीय नाहीं. तो

दुसऱ्याचें नुकसान करणार नाही हें खरे. पण हें त्याचें मुख्य ध्येय नसून समाजांतील मनुष्यांची बुद्धि अधिकाधिक शुद्ध होत जाऊन आपल्याप्रमाणेंच अखेर सर्व लोक जेणेंकरून आध्यात्मिक पूर्णावस्थेस पोंचतील असे प्रयत्न स्थितप्रज्ञ करीत असतो" (गी. र पृ. ३८०) "साम्यबुद्धि वाढविण्याचा अभ्यास प्रत्येकानें केला पाहिजे; आणि या क्रमानें जगातील सर्व मनुष्यांची बुद्धि जेव्हा पूर्ण साम्यावस्थेस पोचेल तेव्हांच कृतयुगप्राप्ति होऊन मानवजातीचें जे परमसाध्य किंवा पूर्णावस्था ती सर्वांस प्राप्त होईल."

आधिभौतिक सुखवाद्यास आध्यात्मिक सुखाचे, बुद्धीच्या समत्वाचें आणि आत्मैक्य साक्षात्कारांचे जसे महत्त्व पटवून दिलें, तसेंच अध्यात्म-पंथांतील लोकांस भौतिक सुखाचे व उन्नतीचेहि महत्त्व गीतारहस्यांत पटवून दिलें आहे. 'नुसत्या ऐश्वर्यापेक्षां नुसतें आत्मज्ञान जरी अधिक योग्यतेचें असलें, तरी या जगांत ज्यांस रहावयाचें आहे त्यांस लोकांप्रमाणेंच ऐहिक समृद्धीहि आपणांस किंवा आपल्या देशास प्राप्त करून घेण्याची आवश्यकता व नैतिक हक्कहि असल्यामुळें मनुष्याचें या जगांत परमसाध्य काय या प्रश्नांत शांति व पुष्टि, प्रेय व श्रेय, किंवा ज्ञान व ऐश्वर्य या दोहोंचा समुच्चय, हेंच आमच्या कर्मयोगशास्त्राचे शेवटचें उत्तर आहे......तथापि, ज्ञानाखेरीज नुसतें ऐश्वर्य आसुरी संपत होय असें गीताच सांगत आहे म्हणून ऐश्वर्याबरोबर ज्ञान व ज्ञानाबरोबर ऐश्वर्य किंवा शांति आणि पुष्टि या दोहोंचीहि जोडी नेहमी कायम ठेविली पाहिजे असे सिद्ध होतें. ज्ञानाबरोबरच कां होईना पण ऐश्वर्य पाहिजे, असें म्हटल्यावर कर्म करणें ओघानेंच प्राप्त होतें."

—गी. र पृ. ११८–१९

## माणसाचें परमसाध्य कोणतें ?

मनुष्यानें जगांत वागत असता आपणापुढे कोणतें परमसाध्य ठेवून वागावे या प्रश्नांचीं उत्तरे पुढीलप्रमाणें देतां येतील:—

(१) स्वतःचें सुख, वैभव, किंवा ऐश्वर्य.
(२) स्वतःचें आत्मसुख किंवा वैयक्तिक मोक्ष व आत्मज्ञान
(३) सार्वत्रिक सुख ( बाह्य सुख ).
(४) सार्वत्रिक आत्मसुख.

(५) सार्वत्रिक भौतिक व आत्मिक सुख.

यापैकी गीतारहस्यांतील नीतिशास्त्राला पांचवें उत्तर हें ग्राह्य वाटतें व त्यालाच मानव-समाजाची पूर्णावस्था असें नांव देतां येईल. यांत भौतिक सुखाचा अंतर्भाव झाला असला, तरी तो गौणत्वानें व साधन या दृष्टीनेंच झालेला आहे. तथापि तें अंग उपेक्षणीय नाही हें विसरतां कामा नये. हीच गोष्ट दुसऱ्या शब्दांत सांगावयाची म्हणजे समाजांतील सर्व व्यक्तींना धर्म, काम आणि मोक्ष यांची प्राप्ति होणें म्हणजेच समाजाची पूर्णावस्था होय व ती प्राप्त करून घेण्यासाठींच सर्वांनी आपली अंतःशुद्धि करीत राहून समाजाच्या सुखांत भर घातली पाहिजे व त्याचा आत्मोद्धार करण्यासाठी झटलें पाहिजे. स्वतःच्या उन्नतींतच नव्हे, तर समाजाच्या सेवेंतहि बाह्य भौतिक सुखापेक्षां आत्मौपम्य बुद्धीच्या वाढीस आणि आत्मानुभवाच्या प्राप्तीस अशा प्रकारें प्राधान्य दिले आणि सर्व मनुष्यजातीला आध्यात्मिक पूर्णत्व प्राप्त करून देण्याचे ध्येय स्वीकारले म्हणजे समाजहित किंवा सर्वभूतहित या शब्दांनाहि अधिक खोल आणि श्रेष्ठ प्रतीचा अर्थ प्राप्त होतो. भौतिक उन्नति हेंच ध्येय न राहतां 'अमृतत्वस्य तु नाशास्ति वित्तेन' यांत अभिप्रेत असणाऱ्या अमृतत्वाची प्राप्ति, याला साहजिकच प्राधान्य मिळतें.

## सत्य, अहिंसा व तप

या नीतिशास्त्रांत सत्य, अहिंसा व तप या नीतिनियमांना एक प्रकारचें शाश्वत आणि नित्य असें स्वरूप प्राप्त होतें. आजच्या समाजाच्या अपूर्णावस्थेंत या शाश्वत नीतिधर्माचें शुद्ध स्वरूप जरी आपणांस प्रतीत होत नसलें आणि समाजाच्या अपूर्णावस्थेत मोठमोठ्याच्या हातूनहि सत्यादि नीतिधर्मांचें पूर्णपणें पालन होत नसलें, तरी हा त्या नीतिधर्माच्या अपूर्णत्वाचा पुरावा नसून समाजाच्या अपूर्णावस्थेचाच तो पुरावा आहे, असें गीतारहस्यांत सांगितलें आहे. नीतिधर्माचें पूर्ण किंवा परमावधीचें शुद्ध स्वरूप कोणतें याचा जेव्हां विचार करावयाचा असतो, तेव्हां कृतयुगांतील समाजांत कोणते नीतिनियम प्रत्ययास येतील किंवा आचरिले जातील हें पाहूनच ठरविलें पाहिजे. हें परमावधीचें शुद्ध स्वरूप आजच्या समाजांत आचरितां येत नसल्यास ती समाजाची अपूर्णता समजून ही अपूर्णता नष्ट कशी होईल याबद्दल झटलें पाहिजे, सत्यादि नीतिधर्मांस नांवें ठेवूं नयेत, असें रहस्यकारांचें मत आहे.

## शुद्ध नीति व व्यवहार

" पूर्णावस्थेंतील समाजांतून खालीं उतरलें म्हणजे अनेक गोष्टींचा सारासार विचार करून परमावधीच्या नीतिधर्मांत जर थोडाबहुत तरी फरक करावा लागतो; तर नीतिधर्माची नित्यता कोठें राहिली, आणि ' धर्मो नित्यः ' म्हणून व्यासांनीं 'भारतसावित्रीं'त जे तत्त्व सांगितलें आहे त्याची वाट काय, अशी आधिभौतिक-वाद्यांची एक शंका आहे. त्याचें असें म्हणणें आहे कीं, धर्माचे अध्यात्मदृष्ट्या सिद्ध होणारे नित्यत्व केवळ काल्पनिक असून प्रत्येक समाजाच्या स्थितीप्रमाणे त्या त्या काळीं ' पुष्कळाचें पुष्कळ सुख ' या तत्त्वानें जे नीतिधर्म प्राप्त होतील, तेच खरे नीतिनियम होत. परंतु हा कोटिक्रम बरोबर नाहीं. भूमितिशास्त्रांत सांगि-तल्याप्रमाणे रुंदीशिवाय सरळ रेघ किंवा सर्वांशीं निर्दोष वर्तुळपरीघ जरी कोणास काढतां आला नाहीं, तरी तेवढ्यामुळें सरळ रेघेची किंवा शुद्ध वर्तुळाची शास्त्रीय व्याख्या जशी चुकीची किंवा निरर्थकहि होत नाही, तद्वत् सरळ व शुद्ध नीतिनिय-मांची गोष्ट आहे. शिवाय एकाद्या गोष्टीचें परमावधीचे शुद्ध स्वरूप कोणतें याचा आधीं निश्चय केल्याखेरीज व्यवहारात त्या गोष्टीची जीं अनेक रूपें नजरेस पडतात, त्यांत सुधारणा करणें किंवा सारासार विचारांनी त्यांतील तारतम्य ओळखणेहि शक्य नाहीं; व यासाठीच बावन्न कसी सोनें कोणतें याचा सराफ प्रथम निर्णय करीत असतो.......दुष्ट व लोभी लोकांच्या समाजांत अहिंसा, सत्य वगैरे नित्य नीतिधर्म पूर्णपणें पाळितां येत नाहीत हें खरे; पण त्याचा दोष या नित्यधर्मास देणें योग्य नाहीं. सूर्याच्या किरणांनीं एकाद्या पदार्थाची सावली सपाट प्रदेशावर सपाट आणि उंच-सखल प्रदेशावर उंच-सखल पडते, म्हणून ती सावली मुळातच उंचसखल असली पाहिजे असें ज्याप्रमाणे अनुमान करतां येत नाहीं, त्याप्रमाणें दुष्ट लोकांच्या समाजांत नीतिधर्माचें पराकाष्ठेचें शुद्ध स्वरूप आढळून येत नाहीं, म्हणून अपूर्णावस्थेतल्या समाजांत आढळून येणारें नीतिधर्माचें अपूर्ण स्वरूपच मुख्य किंवा मूळचें होय, असें म्हणतां येत नाहीं. हा दोष समाजाचा आहे; नीतीचा नाहीं. **म्हणून जे पुरुष शहाणे आहेत, ते शुद्ध व नित्य नीतिधर्माशीं तंटा करीत न बसतां समाज जेणें-करून चढत्या पायरीस लागून पूर्णावस्थेंत पोचेल असे प्रयत्न करीत असतात.** लोभी मनुष्यांच्या समाजांत अशा प्रकारें वागत असतां अपरिहार्य म्हणून नित्य नीतिधर्मांना कांहीं अपवाद आमच्या शास्त्रकारांनीं

सांगितले असले तरी त्यासाठीं ते प्रायश्चित्तें सांगतात आणि पाश्चिमात्य आधि-भौतिक नीतिशास्त्र हेच अपवाद उजळ माथ्यानें प्रतिपादन करीत असून, सदर अपवाद ठरवितांना उपयोगी पडणारें बाह्य फलांच्या तारतम्याचें तत्त्व भ्रमानें नीतीचें मूलतत्त्व मानितात "

—गी. र. पृ. ३७४–७६

## भौतिक सुखवाद्यांची चूक

भौतिक सुखावरच नीतिशास्त्राची इमारत उभारूं पाहणारांची मुख्य चूक मनुष्याच्या अंतःशुद्धीला गौणत्व देण्यांत होत असते. मनुष्य हा अपूर्ण असून त्याला पूर्ण बनविणे हे नीतिशास्त्राचें ध्येय आहे. त्याचे अपूर्णत्व नाहींसें करण्यास त्याच्या परिस्थितीची सुधारणा पुरेशी पडत नाहीं. इतकेच नाहीं, तर तो पूर्ण बनण्याचा कळत अगर नकळत यत्न न करील तर त्याला आपल्या परिस्थितीची सुधारणा करतां येणार नाहीं. यासाठीं आत्मोन्नति व आत्मशुद्धि यांना नीतिशास्त्रांत प्राधान्य दिलें पाहिजे. हाच आध्यात्मिक नीतिशास्त्राचा आधार आहे. या आत्मशुद्धींत इंद्रियें व मन यांच्या निग्रहाला किंवा संयमाला नेहमींच स्थान दिलें पाहिजे. आत्म्याच्या अधीन बुद्धि, बुद्धीच्या अधीन मन व मनाच्या अधीन इंद्रियें अशी व्यवस्था असल्या-खेरीज मनुष्याला आपलें कर्तव्य कळणार नाहीं व कळलें तरी तें वळणार नाहीं; म्हणजे हातून घडणार नाहीं. हा इंद्रियांचा व मनाचा संयम म्हणजेच तप. यानंतर प्रेम—निःस्वार्थी-निष्काम-निरपेक्ष प्रेम—हा दुसरा शाश्वत नीतिधर्म आहे. यालाच अहिंसा हें दुसरें नांव आहे. सर्व भूतात्मभाव हें आत्म्याचें सत्य स्वरूप आहे व सत्याचा साक्षात्कार म्हणजेच मुक्ति होय. अशा रीतीनें सत्य, अहिंसा आणि तप हे आध्यात्मिक नीतिशास्त्रांतील शाश्वत नीतिधर्म असून त्यांच्यापासून ढळणें हें मनुष्याचें अपूर्णत्व आहे. या तत्त्वांना शास्त्रकारांनीं जरी कांहीं अपवाद सांगितले असले किंवा कांहीं ठिकाणीं ज्ञानी पुरुषांनींहि या बाबतींत विशेष अड-चणीच्या प्रसंगीं फार ताणून धरलेले नसलें, तरी तो गौण पक्ष आहे व त्याबद्दल प्रायश्चित्त घेतलें पाहिजे असेंहि त्यांनीं म्हटलें आहे.

" केवळ सत्यशब्दोच्चारण म्हणजे नुसतें वाचिक सत्य आणि सर्वभूतहित म्हणजे वास्तविक हित, या दोहोंमध्यें जेथें विरोध येतो तेथें व्यवहार दृष्ट्या अपरि-हार्य म्हणून असत्य बोलून निर्वाह करून घेण्यास कांहीं ठिकाणीं त्यांनीं परवानगी

देली आहे खरी. तथापि, सत्यादि नीतिधर्म त्यांच्या मतें नित्य म्हणजे सर्वकालीं एकसारखेच अबाधित असल्यामुळें, पारलौकिक दृष्टया सामान्यतः हें थोडें तरी पापच होय असें ठरवून त्यासाठीं त्यांनी प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ”

—गी र पृ ३७

## आपद्धर्माचें स्वरूप

लोकसंग्रहासाठीं सुद्धा अपरिहार्य म्हणून जी हिंसा किंवा असत्याचरण करावें लागतें तें गौण आहे, इतकेच नाहीं, तर तें पाप आहे व त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावें असें म्हणण्याचें कारण असत्याचरण किंवा हिंसा यांच्यामुळे जे लोकहित आपण साधतों असें म्हणतों, तें तितकेंसें साधत नाही कारण त्यामुळें बाह्यहित साधलें तरी लोकांना अधिकाधिक सत्यनिष्ठ, प्रेममय व तपोधन बनविण्याचें जें कार्य तें मागें पडतें, हें कोणासहि मान्यच करावें लागतें. लोक जर सत्यनिष्ठ, प्रेममय व तपोधन बनणार नाहींत, तर त्यांना पूर्णत्व प्राप्त होऊन सत्ययुगप्राप्ति कशी होणार ? तितक्या पुरतें हें ध्येय सुटले असे म्हणावें लागतें व म्हणूनच लोकसंग्रहार्थ अपरिहार्य म्हणून करावी लागणारी हिंसा किंवा असत्याचरण हा आध्यात्मिक नीतिशास्त्राच्या दृष्टीनें गौण पक्ष ठरतो.

याचसाठीं ही हिंसा शक्य तितकी कमी करण्याचा सतत प्रयत्न सत्पुरुषांनीं केला पाहिजे. केवळ आज जग अपूर्ण आहे म्हणून हिंसा अपरिहार्य समजून ती परीत सुटणें हा धर्म नव्हे यासंबंधीहि गीतारहस्यांतील पुढील दोन उतारे वाचनीय आहेत.

“ सत्याप्रमाणेच क्षमा हा धर्महि अखेर म्हणजे समाजाच्या पूर्णावस्थेंत अपवादरहित व नित्य रूपानें शिल्लक राहील यांत संशय नाहीं. किंबहुना, समाजाच्या हल्लींच्या अपुऱ्या अवस्थेंतहि पुष्कळ प्रसंगी शांततेनें जें काम होतें तें रागानें होत नाहीं, असे नजरेस येतें ”

—गी. र. पृ ३८९-९०

“ पण या ठिकाणीं दुसरे असेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, दुष्ट पुरुषाचा प्रतिकार साधुपणानें होणें शक्य असलें, तर प्रथम तो साधुपणानेंच करावा. कारण दुसरा मनुष्य दुष्ट झाला म्हणजे तेवढ्यामुळेंच आपणहि त्याबरोबर दुष्ट झालें पाहिजे किंवा एकजण नकटा झाला म्हणून इतरांनींहि त्यासाठी आपलीं नाकें कापून घ्यावीं

असें होत नाही. किंबहुना, हा धर्मेहि नव्हे........पण असल्या साधुपणानें दुष्टाच्या दुष्ट कृत्याचें निवारण होत नसेल तर, किंवा सामोपचाराचें व शिष्टाईचे बोलणें या दुष्टास पसंत नसेल तर "कंटकेनैव कंटकम्" या न्यायानें पोटिसानें बाहेर न पडणारा कांटा अखेर साध्या किंवा लोखंडी कांटयानें म्हणजे सुईनेंच बाहेर काढणे जरूर आहे. कारण केव्हांहि झालें तरी लोकसंग्रहार्थ दुष्टांचा निग्रह करणें, हें भगवंताप्रमाणें साधुपुरुषाचेहि धर्मदृष्टया पहिले कर्तव्य होय. 'साधुपणानें दुष्टास जिंकावा' या वाक्यांतहि दुष्टाव्याचा जय किंवा निवारण करणें हे साधुपुरुषांचे मुख्य कर्तव्य आहे, ही गोष्ट पहिल्यानें गृहीत धरूनच मग तत्सिद्ध्यर्थ प्रथम उपाय कोणता योजावा याचे निदर्शन केलें आहे साधुपणानें निवारण होणें शक्य नसेल, तर जशास तसें होऊन दुष्टाचे निवारण करूं नये, त्याच्या दुष्ट कृत्यांस साधुपुरुषांनीं बळी पडावे, असें आमच्या धर्मग्रंथकारांनीं कोठेहि प्रतिपादन केलें नाही."

— गी. र. पृ. ३९४–९५

## लोकसंग्रहार्थ अपरिहार्य हिंसा

अशा प्रकारें ज्या ठिकाणी लोकसंग्रहार्थ हिंसा करणें अपरिहार्य असेल व अहिंसेनें तें कार्य होणे अशक्य असेल, तेथें ती करावी असें रहस्यकार सांगतात. येथेंच गांधीजी व लोकमान्य यांच्या तत्त्वज्ञानांत अनुल्लंघनीय भेद आहे असें कांहींचे मत आहे पण आम्हांस हें तितकेसें पटत नाही. गांधीजींनाहि विशिष्ट परिस्थितींत, विशिष्ट समाजांत, विशिष्ट प्रकारची अपरिहार्य हिंसा करणें हें मनुष्याचें–अहिंसाधर्मी मनुष्याचेंहि–कर्तव्य वाटतें. यासंबंधीं पुढील उतारा वाचावा :

"Thus we arrive at the following result from the foregoing

(1) It is impossible to sustain one's body without the destruction of other bodies to some extent

(2) All have to destroy some life. [a] for sustaining their own bodies. [b] for protecting those under their care. [c] sometimes for the sake of those whose life is taken.

(3) (a) and (b) in (2) means himsa to a greater or less extent. (c) means no himsa and is therefore ahimsa. Himsa in (a) and (b) is unavoidable

(4) A progressive ahimsaist will therefore commit the himsa contained in (a) and (b) as little as possible only when it is unavoidable, and after full and mature deliberation and having exhausted all remedies to avoid it.

...... And therefore, although there can be no absolute duty to kill dogs etc, it becomes a necessary duty for certain people, at certain times and under certain circumstances."

—Young India

भाषान्तरः—" अशा प्रकारे आपण वर लिहिलें त्यावरून पुढील निष्कर्ष काढूं शकतोंः

(१) कांहीं प्रमाणांत इतर शरीरांची हिंसा केल्याखेरीज आपलें शरीरहि आपण धारण करूं शकत नाहीं.

(२) सर्वांनाच कांहीं हिंसा करावी लागते.

[अ] स्वतःच्या शरीरधारणार्थ.

[ब] आपले जे पाल्य आहेत त्यांच्या संरक्षणार्थ.

[क] कित्येक वेळां ज्यांची हिसा करावयाची त्यांच्या हिताकरितांच. [ आसन्नमरण वासराचें उदाहरण ]

(३) दोन कलमांतील पोटकलमें अ व ब ही हिंसा आहे पण क ही हिंसा नव्हेच.

(४) अहिंसेचा धर्म क्रमशः आचरण करणारा मनुष्य अ व ब पोटकलमांतील हिंसा शक्य तितक्या कमी प्रमाणांत करील. पण जेव्हां ती अपरिहार्य असेल, तेव्हांच पूर्ण विचारांतीं टाळण्याचे शक्य ते प्रयत्न केल्यानंतरच करील.

......आणि म्हणून जरी कुत्रीं वगैरे मारणें हा निरक्षेप धर्म केव्हांच होऊं शकत नाहीं, तरी विशिष्ट लोकांचें, विशिष्ट परिस्थितींत व विशिष्ट काळीं तें अवश्य कर्तव्य बनतें. "

ही विचारसरणी गांधीजी केवळ जनावरांनाच लावतात असें नाहीं; तर ते ती मनुष्यालाहि लावतात. याच लेखांत ते लिहितातः—

" Suppose man runs amuck and goes furiously about sword in hand and killing one that comes his way and no one dares to capture him alive. Any one who dispatches this lunatic will earn the gratitude of the community and be regarded a benevolent man.

From the point of view of Ahimsa it is the plain duty of every one to kill such a man. There is indeed one exception if it can be so called. The yogi who can subdue the fury of this dangerous man may not kill him. But we are not dealing with beings who have almost reached perfection; we are considering the duty of the society, of the ordinary erring human beings."

—Young India, 1924-26, p. 969

भाषान्तरः—" कल्पना करा कीं, एक मनुष्य हातांत तलवार घेऊन बेफामपणानें जो मार्गांत येईल त्याला ठार करीत सुटला आहे आणि त्याला जिवंत पकडावयास कोणी धजावत नाहीं. अशा वेड्याचा जो समाचार घेईल त्याला समाज परोपकारी समजून स्वतःस त्याचा उपकृत मानील. अहिंसा–दृष्टीनें अशा मनुष्यास ठार मारणें हें प्रत्येकाचे स्पष्ट कर्तव्य आहे. यालाहि तसेंच म्हटलें तर एक अपवाद आहे. जर एकादा योगी त्याचा बेफामपणा शांत करूं शकेल तर त्यानें त्याला मारूं नये. पण अशा जवळ जवळ पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या विभूतींचा आपण विचार करीत नसून सामान्य प्रमादी मनुष्यांच्या व समाजाच्या कर्तव्यासंबंधींच आपण विचार करीत आहोंत."

गांधीजीचे हे विचार जो वाचील व त्यांची गीतरहस्यांतील वरील उताऱ्यांशीं जो तुलना करील, त्याला या दोन विभूतींच्या तात्त्विक नीतिशास्त्रांत जमीन-अस्मानइतकें अंतर आहे असें म्हणतां येणार नाहीं. समाजाच्या अपूर्णावस्थेंत समाजहितासाठीं अपरिहार्य म्हणून इतर सर्व मार्ग नाहींसे झाल्यावर हिंसा करावी लागते व ती करणें समाजाचें या परिस्थितींत कर्तव्य होतें हें गांधीजींनाहि मान्य आहे. तसेंच, दुष्टावा जिंकण्याचें कार्य अहिंसेनें शक्य असेल तर तें अहिंसेनेंच केलें पाहिजे, केवळ

दुसरा दुष्ट झाला म्हणून आपण दुष्ट होऊ नये व या तत्त्वाचा उपयोग हल्लीच्या अपूर्ण समाजांतहि अनेक वेळां होऊं शकतो, हें लोकमान्यांनाहि मान्य आहे. लोकसंग्रहार्थहि हिंसा करणें हा गौण मार्ग आहे, हेहि त्यांना मान्य आहे. तसेंच अहिंसा हेंच नीतिधर्माचें शुद्ध व नित्य स्वरूप आहे, हेंहि त्यांना मान्य आहे. मग—

## भेद कोठें आहे ?

गांधीजी व लोकमान्य याच्यांत मुळीच भेद नाही असें आमचें मत नाही. पण तो भेद तत्त्वज्ञानांत फारसा नसून वर्तन-तत्त्वात, धोरणात आणि विशिष्ट कार्यात 'जशास तसें ' हें तत्त्व लागू करणे अपरिहार्य आहे किंवा नाहीं, या बाबतींत आहे. 'दुष्टाशीं दुष्ट होऊं नये, त्याचा दुष्टावा प्रेमानेंच जिंकावा' हें तत्त्व लोकमान्यांनीं आपलें वर्तनतत्त्व म्हणून गृहीत केले नव्हतें. तें तत्त्व श्रेष्ठ असलें, तरी आपल्या आजच्या राजकारणांत त्यानें कार्य होईल असे त्यांना वाटत नव्हतें. त्यांचे सर्व राजकारण कायद्याच्या मर्यादेतीलच असून ' जशास तसे ' या तत्त्वावरच अधिष्ठित झालें होतें. आमच्या राजकारणाचा लढा " अक्रोधेन जयेत् क्रोधम् " या तत्त्वानें सुटणें शक्य नाहीं, असें वाटत असल्यामुळें आज अपरिहार्य म्हणून जशास तसें हें तत्त्व आचरणे भाग आहे असे त्यांना वाटे. पण कायद्याच्या कक्षेबाहेर राजकारण गेल्यावर काय करावयाचे, याबद्दल त्यांचें मन साशंकच असावे. कायद्याच्या बाहेर जाऊन जशास तसें हे तत्त्व अवलंबिल्यास सशस्त्र क्रांतीच्या क्षेत्रांत तें शिरतें व तीच त्याची परिणति. पण ती तर अशक्य दिसत होती. निःशस्त्र क्रांति हेंच भवितव्य त्यांना दिसत होतें. तेंच त्यांनीं बोलून दाखविले. पण ती आचरणांत आणावयाची तर ' जशास तसें ' हें तत्त्व सोडून ' अक्रोधानें क्रोध जिंकावा ' या वर्तनतत्त्वाचा अवलंब करावा लागतो, हें त्यांच्या बुद्धीला पटलें होतें. गांधीजीचा मार्ग मोठा आहे, त्यांची योग्यता मोठी आहे, असें ते लिहितात. पण आजच्या जगांत तो आचरतां येईल काय ? सशस्त्र क्रांति ही आजच्या स्थितींत अपरिहार्य हिंसा नव्हे काय ? असेहि विचार त्यांच्या डोक्यांत खेळत असतील. पण आज आपणांस तेंहि शक्य नाहीं, अशी एक प्रकारची साशंक वृत्ति दिसते. येथें

## अपरिहार्य हिंसा कशी ठरवावी ?

असा तात्त्विक प्रश्न उद्भवतो. त्याला सार्वकालिक उत्तर नाहीं हें उत्तर

स्थलकालसापेक्षतेनें द्यावें लागतें. याचा निर्णय कोणी करावयाचा? याबद्दल गीतारहस्य म्हणतें, "पण मनुष्यांचे व्यवहार त्यांच्या इच्छाधीन असल्यामुळें, आणि वर सांगितलेल्या त्रैलोक्यचिंतामणीमात्रेचा दुष्टांवर केव्हां उपयोग करावा हें निश्चित ठरविण्यास लागणारें धर्मज्ञानहि अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें आपण करूं इच्छितों तो प्रकार योग्य कां अयोग्य, धर्म्य की अधर्म्य, याबद्दल मोठमोठ्या माणसांसहि प्रसंग-विशेषीं मोह पडत असतो—'किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः'"

—गी. र. पृ. ४१६

"अशा प्रसंगी नुसत्या विद्वान् पण नेहमीच थोड्याबहुत स्वार्थबुद्धीनें पछाड-लेल्या पुरुषांच्या पांडित्यावर किंवा केवळ आपल्या सारासार विचारावरच भिस्त न ठेवतां, पूर्ण साम्यावस्थेस पोंचलेल्या परमावधीच्या साधुपुरुषाच्या शुद्ध बुद्धीसच अखेर शरण जाऊन त्या गुरूचा निकाल प्रमाण मानिला पाहिजे."

—गी र. पृ. २९६

"साम्यबुद्धि प्रमाण मानली म्हणजे विशेष अडचणीच्या प्रसंगीं धर्माधर्म निर्णे-यार्थ ज्ञानवान् साधु पुरुषासच शरण गेलें पाहिजे असें प्राप्त होतें खरें; पण त्यास कांही इलाज नाही."

—गी. र. पृ. ४०२

कांही लोक अशा ठिकाणीं केवळ शास्त्रवचनांवरच विसंबून राहतात पण तेंहि लोकमान्यांना पटत नाहीं. "अत्यंत सर्वमान्य झालेल्या शास्त्रकारांची बुद्धि अशा प्रकारची शुद्ध असते व त्यामुळेंच 'तस्माच्छास्त्रं प्रमणं ते कार्याकार्यव्यवस्थितो'– ...असें भगवंतानी अर्जुनास सांगितलें आहे. तथापि, कालमानाप्रमाणें पुढच्या पुढच्या साधु पुरुषांस या शास्त्रांतहि फरक करण्याचा अधिकार प्राप्त होत असतो, हें विसरतां कामा नये."

—गी. र. पृ ३९६

तेव्हां केवळ आजपर्यंतच्या धर्मशास्त्रांत विशिष्ट गोष्टीसाठी हिंसा अपरिहार्य आहे असें सांगितलें, यावरून प्रत्येक वेळेचा प्रश्न सुटूं शकत नाहीं.

## निःशस्त्र क्रांतीचें ध्येय

भरतखंडात निःशस्त्र किंवा अहिंसामय क्रांतीचें ध्येय प्रथम गांधीजींनींच पुकारलेलें

नाहीं. लो. टिळक व योगी अरविंद घोष या दोघांनीहि तें पुकारलें होतें. अरविंद बाबू म्हणतात,

"On their fidelity to Swadeshi, to Boycott, to passive resistance, rested the hope of a peaceful and spiritual revolution. On that it depended whether India would give the example unprecedented in history of a revolution worked only by moral force and peaceful pressure."

—Aurobindo's speeches, p. 211-12

"शांततेच्या व आध्यात्मिक क्रांतीची आशा स्वदेशी, बहिष्कार व सत्याग्रह यांवरील आमच्या निष्ठेवर अवलंबून आहे. केवळ आत्मबलानें व शांततेच्या दड-पणानें घडून आलेल्या क्रांतीचें इतिहासांत अपूर्व असें उदाहरण हिंदुस्थान दाखवून देणार किंवा नाही हे त्यावर अवलंबून आहे"

तात्पर्य, आपण एक आत्मबलाची अपूर्व क्रांति करीत आहोंत याची कल्पना लो. टिळक व योगी अरविंद यांना होती. पण त्यांची प्रकृति किंवा त्यांनी अवलंबिलेलें वर्तनतत्त्व–जशास तसेचें तत्त्व–या क्रांतीच्या ध्येयाशी विसंगत होतें. यामुळें त्यांच्याजवळ जरी एक अपूर्व कार्यक्रम होता, तरी तो कार्यक्रम अमलांत आणणारा नेता सध्यां नाही याची जाणीव त्यांना होती. योगी अरविंद हे पॉंडेचरीस जाण्याच्या अगोदर थोडेच दिवस लिहितात:—

"The party is there, not less pervading and powerful as before, but in want of a policy and leader. The first it may find, the second only God can give it......... The men who have led hither-to have been strong men of high gifts and commanding genius, great enough to be protegonists of any other movement: for even they were not sufficient to fulfill one which is the chief current of a worldwide revolution. Therefore the Nationalist party, custodians of the future must wait for the man who is to come, calm in the midst of calamity, hopeful

under defeat, sure of eventual emergence and triumph and always mindful of the responsibility which they owe not only to their Indian posterity, but to the world."

—Ibid, p. 225–26

भाषान्तरः—" पूर्वींइतकाच प्रबल व व्यापक असा राष्ट्रीय पक्ष आहे. पण त्याला कार्यक्रमाची व नेत्याची आज वाण आहे. कार्यक्रम त्याला मिळेल, पण नेता हा फक्त परमेश्वरच देऊं शकेल आजपर्यंत ज्यांनी नेतृत्व केलें तेहि खंदे पुरुष आहेत व त्यांच्या अंगीं उच्च गुणहि आहेत. त्यांची प्रतिभा प्रभावी आहे. इतर कोणत्याहि चळवळीचें नेतृत्व करण्याइतके ते मोठेहि आहेत. पण तेसुद्धां सर्व जगद्व्यापक अशा क्रांतीचा एक प्रमुख प्रवाह बनलेल्या या क्रांतीचें नेतृत्व करण्यास पुरेसे पडले नाहीत. म्हणून भविष्यकालाचा रखवालदार असा जो राष्ट्रीय पक्ष त्यानें पुढे येणाऱ्या नेत्याची वाट पहातच कांही काळ कंठिला पाहिजे. हा भावी नेता आपत्तीतहि शांत राहील, पराभवांतहि आशावादी असेल, अंतिम यशाबद्दल निश्चिंत व सश्रद्ध असेल आणि आपल्या भारतीय वंशजांसंबंधींच नव्हे, तर सर्व जगासंबंधीहि आपली जी जबाबदारी आहे, तिची त्याला पूर्ण जाणीव असेल "

## टिळकांनीं काय केलें असतें ?

तात्पर्य, आजच्या राजकारणांत ' जशास तसे ' याच तत्त्वाचा अवलंब करणें अपरिहार्य आहे, असें मानणारे आपल्या बरोबरीचे पुढारी अहिंसामय क्रांतीचा मार्ग जगाला दाखवून देण्यास प्रकृतिगुणांनीच असमर्थ आहेत व या क्रांतीचें नेतृत्व करणारा कोणी असामान्य नेता आल्याखेरीज हें कार्य तडीस लागत नाहीं, याची जाणीव या पत्रांत योगी अरविंद यांनीं व्यक्त केली आहे. लोकमान्यांच्या उत्तर आयुष्यांत त्यांनाहि ही जाणीव झाली असल्याचें दिसतें. म्हणूनच ते गांधीजींना तुमचा मार्ग श्रेष्ठ आहे खरा, पण तो लोक कितपत अनुसरतात तें पहा, लोक तुमच्यामागें आले, की मी केव्हांहि आहेच असें म्हणत असत. कित्येक वेळां हाच भावी भरतखंडाचा नेता असेंहि गांधीजीबद्दल ते बोलत. भरतखंडाच्या राजकारणाचें अहिंसामय क्रांति हेंच भवितव्य त्यांच्या बुद्धिरूप नेत्रांना दिसत होतें. दुष्टाचा दुष्टावा प्रेमानें जिंकणें हाच खरा नित्यधर्म आहे, असेंहि त्यांना वाटे. मनुष्यजातीला

पूर्णावस्थेस नेण्याचा हाच मार्ग असून त्याचें केव्हां अवलंबन करावें व अपरिहार्य म्हणून नित्य नीतिधर्माला सोडून केव्हां वर्तन करावें, हें सामान्यबुद्धीला ठरवितां येत नाही, असेंहि त्यांचें मत होतें. हा मार्ग केवळ ख्रिस्ती किंवा बुद्ध धर्मांतच सांगितला आहे असें नसून त्याची महति आमच्या उपनिषदांनींहि गाइली आहे. अशा स्थितींत गांधीजीना त्यानी शक्य तें साहाय्य केलें असतें असें आमच्या बुद्धीस वाटतें. त्यांच्यांतील खरा भेद अंतिम तत्त्वाचा नव्हता. तो परिस्थितीच्या स्वरूपनिर्णयासंबंधींचा थोडासा असेलहि; पण मुख्यतः प्रकृतीचा होता आणि आजन्म आचरिलेल्या वर्तनतत्त्वाचा होता. पण भारतीय राजकारणाच्या भावी विकासास भिन्न वर्तनतत्त्वाच्या व भिन्न प्रकृतीच्या नेत्याची आवश्यकता आहे. अशीहि जाणीव त्यांना असेल काय ? व म्हणूनच कदाचित् हा पुरुष भावी भारतीय नेता होईल असे उद्गार त्यांच्या तोंडून निघत असतील काय ? कोणीं सांगावे ?

## जमीन–अस्मानाइतकें अंतर नाहीं

एक गोष्ट निश्चित वाटते कीं, दोघांच्या नीतिशास्त्रांत जमीन-अस्मानाइतकें अतर आहे, हें मत फोल आहे. दोन्हीहि नीतिशास्त्रें एकच असून दोहोनाहि सत्यादि नीतिधर्मांचे नित्यत्व मान्य आहे व त्याचें शुद्ध स्वरूप ज्या समाजांत पूर्णपणें प्रतीत होऊं शकेल असा सत्यनिष्ठ, प्रेममय व तपोधन समाज निर्माण करणें हेंच त्या नीतिशास्त्राचे आध्यात्मिक ध्येय आहे. हें ध्येय गांठण्यासाठी कायावाचामनानें शुद्ध सत्यनिष्ठ व अहिंसावादी राहण्याचा शक्य तो यत्न केला पाहिजे. समाजाच्या अपूर्णावस्थेंत हीं तत्त्वें अमलांत येऊं शकत नाहीत म्हणून अशा अपूर्ण समाजांत हिंसा हें लोकसंग्रहार्थ कर्तव्य बनतें हेंहि खरें; पण त्यामुळें सत्य, अहिंसादि नित्य नीतिधर्मांशीं भांडत न सुटतां जेणेंकरून समाजाचें पाऊल पूर्णावस्थेकडे अधिकाधिक पडत राहील तसें वर्तन करीत राहिलें पाहिजे. कित्येक प्रसंगीं कायिक हिंसा करावी लागली, तरीहि वाणीला व मनाला तिचा स्पर्श न होऊं देण्याचा शक्य तो प्रयत्न केला पाहिजे. लोकसंग्रहाचें कर्तव्य केव्हांच सोडतां उपयोगी नाहीं. या कार्यार्थ करावी लागणारी हिंसाहि शक्य तितकी कमी व अपरिहार्य अशीच असली पाहिजे व ती उत्तरोत्तर कमी करण्यासाठीं झटलें पाहिजे. येथपर्यंत दोघांचें तत्त्वज्ञान एकच आहे. गांधीजी याच्यापुढें जाऊन सांगतील कीं, " राजधर्मांतील सर्वच हिंसा नाहींशी करून दंडहीन समाज स्थापन करणें जरी मला आज

शक्य नसलें, तरी प्रजाधर्मात अहिंसामय क्रांतीचा मार्ग दाखवून देऊन मानव-समाजाला अधिक उन्नत अवस्थेला नेणें आज शक्य आहे व हें करून दाखविण्याचें कार्य आज भरतखडाकडे आले आहे सशस्त्र क्रांति ही आजपर्यंतच्या राजकीय कर्मयोगांत अपरिहार्य गणली असली व त्या दृष्टीनें शास्त्रसंमत असली, तरी आज ती अपरिहार्य हिंसेच्या सदरांत येत नाही. आज लोकसग्रहाला ती अवश्य नाहीं. आज जगाला शस्त्रसन्यासाचा संदेश हवा आहे व तो भरतखड देऊ शकेल ही गोष्ट लो. टिळक व योगी अरविंद यांनीहि बोलून दाखविली आहे व तीच मी आचरीत आहें. लोक जर माझ्या पाठीमागून येतील, तर या पूर्वाचार्यांच्या बुद्धीचा आशीर्वाद माझ्या कार्याला आहे. ज्यांना अध्यात्म व अहिंसा तत्त्वच मान्य नाहीं त्याना हें पटणार नाहीं. पण माझे पूर्वाचार्य तसे नव्हते. भारतीय सस्कृतीहि तशी नाही. येथे अध्यात्मवादाचे आजपर्यंत पोषण झाले आहे व त्यामुळेंच अहिंसामय क्रांतीचे तत्त्वज्ञान येथें आज निर्माण झालें आहे ''

गांधीजीचे राजकारण जसे लोकमान्यांच्या बहिष्कारयोगात बसतें, त्याचप्रमाणे त्यांचा वर्धिष्णु अहिंसावादहि गीतारहस्यांतील आध्यात्मिक नीतिशास्त्रांत अशा प्रकारे बसूं शकतो

लोकशक्ति :
१ ऑगस्ट, १९३५

# म० गांधींचा धर्म आणि व्यवहार : : ७

‘ योगः कर्मसु कौशलम् । ’—भगवद्‌गीता

“ I am not come to destroy, but to fulfil ”

—Sermon on the Mount

म० गांधी हे धर्मनिष्ठ आहेत त्याचप्रमाणे ते व्यवहारकुशलहि आहेत. अनिमदृष्ट्या धर्म आणि व्यवहार यांतील द्वैत त्यांना मान्य नाही. व्यवहारांतील त्यांची यशस्विता त्यांच्या धर्मनिष्ठेवर अवलंबून आहे आणि त्यांच्या अंतःकरणांतील धर्मप्रवृत्ति त्यांना जगांतील व्यवहार करण्यास प्रवृत्त करीत आहे. अर्थकाममूलक सर्व मानव–व्यवहारांना धर्माधिष्ठित बनविणे हे आपलें पवित्र कर्तव्य आहे, असे ते मानतात. धर्माची तत्त्वें पर्वताच्या गुहेंत किंवा अंतःकरणाच्या खोल दरीत दडून न राहतां त्यांच्या ज्ञानमय प्रकाशांत मानवांचे सर्व ऐहिक व्यवहार चालले पाहिजेत, असा त्यांचा आग्रह आहे. धर्म आणि व्यवहार यांची फारकत झाली असतां धर्म पंगु बनतो व व्यवहार अंध होतो अर्थात् या दोहोंचे सहकार्य होण्यावरच मानव-समाजाची खरी उन्नति अवलंबून आहे.

गौतम बुद्ध व येशू ख्रिस्त यांच्याप्रमाणें म. गांधी सत्यनिष्ठ व अहिंसावादी आहेत. श्रीकृष्ण व महंमद पैगंबर यांच्याप्रमाणें ते कर्मयोगीहि आहेत. बुद्धानें व ख्रिस्तानें राजकारण केलें नाहीं, परंतु सत्य आणि अहिंसा यांचे शुद्ध स्वरूप व्यक्त केलें. श्रीकृष्ण आणि महंमद यांनीं राजकारण केलें, परंतु सत्य आणि अहिंसा यांना मर्यादा घातल्या. म. गांधी राजकारण करीत असूनहि सत्य आणि अहिंसा यांना मर्यादा आहेत किंवा अपवाद आहेत असें मान्य करीत नाहींत, तथापि,

जगाची व स्वतःची अपूर्णता ते मान्य करीत असल्यामुळें या तत्त्वांच्या आपल्या आचरणांतहि अपूर्णता आहे ही गोष्ट ते प्रांजलपणें कबूल करतात. एकदर जगाची प्रगति हिंसेतून अहिंसेकडे, असत्यातून सत्याकडे किंवा अपूर्णातून पूर्णाकडे आहे अशी त्यांची श्रद्धा आहे. ते ज्याप्रमाणें स्वतःला पूर्ण समजत नाहीत, त्याचप्रमाणे इतिहासांतील श्रीकृष्ण, बुद्ध, ख्रिस्त किंवा महंमद यांपैकीं कोणासहि पूर्ण समजत नाहीत. श्रीकृष्ण, बुद्ध, ख्रिस्त किंवा महमद या ऐतिहासिक विभूतींहून त्यांच्या त्यांच्या भक्तांच्या अंतःकरणांतील श्रीकृष्ण, बुद्ध, ख्रिस्त किंवा महंमद हे भिन्न आहेत गीतेंतील श्रीकृष्ण म्हणजे ' सपूर्ण ज्ञान ' असे गांधीजी म्हणतात; परंतु त्याचबरोबर तो ऐतिहासिक नसून काल्पनिक आहे असेंहि त्यांचें मत आहे

प्रत्येक भूतमात्राच्या रूपानें जगाचे आदिकारण जें शुद्ध चैतन्य तेंच व्यक्त होत असतें, या दृष्टीनें प्रत्येक मनुष्य हा परमेश्वरी अवतारच आहे. तथापि, सर्वांत हे चैतन्य सारख्याच प्रमाणांत व्यक्त होत नसल्यामुळें ज्या व्यक्तीत तें तत्कालीन व तद्देशीय इतर व्यक्तींहून अधिकात अधिक व्यक्त झालेले दिसतें, त्यांस ईश्वरांश किंवा परमेश्वरी अवतार अथवा ईश्वराचे प्रेषित मानण्याची प्राचीन परंपरा आहे. असेच लोक धर्मस्थापना करून गेलेले आहेत. "धर्मस्थापनेचे नर। ते ते ईश्वराचे अवतार। मागें झाले पुढें होणार। देणें ईश्वराचे॥" या दृष्टीनें म० गांधीसहि केवळ भक्तियुगांत लोकांनीं अवतारी पुरुषांत गणले असतें असें आम्हांस वाटतें. परंतु आज विवेकयुग असल्यामुळें असें कोणीहि म्हणणार नाही व तेंच योग्य आहे. आजपर्यंतचे अवतारी पुरुषहि अपूर्ण होते व मी स्वतःहि अपूर्ण आहें, असें जो म्हणतो त्याला अवतारी कोण म्हणणार ? सर्वच धर्मसंस्थापकांचें कार्य अहिंसेचें, सत्याचा व तपोबलाचा अधिकाधिक विकास करणें हेंच आहे अशी त्यांची श्रद्धा असल्यामुळें बुद्ध आणि ख्रिस्त यांच्या उपदेशात त्यांना ज्याप्रमाणें सत्य आणि अहिंसा यांचा उपदेश आढळतो, त्यांचप्रमाणें श्रीकृष्ण व महंमद यांच्या उपदेशांतहि त्यांना सत्य आणि अहिंसा हीच तत्त्वें दिसतात. त्यांच्या उपदेशांत या तत्त्वांशीं विसंगत असें जें कांही आढळतें किंवा या तत्त्वांना त्यांनीं ज्या मर्यादा ठेविल्या होत्या, त्या तत्कालीन जगाच्या व त्या व्यक्तीच्या अपूर्णतेच्याच निदर्शक आहेत असें ते मानतात. क्षत्रियानें हिंसा करावयास हरकत नाहीं या वचनाचा अर्थ करतांना इतर सर्व वर्णांनीं हिंसा करूं नये असें सांगण्याचाच

उपदेशकाचा हेतु आहे असे ते लोकांना सांगतात. राज्यसंस्था हीसुद्धां अहिंसे-करितांच, म्हणजे जगांत शांततेची प्रस्थापना करण्यासाठीच निर्माण झालेली असल्यामुळें तिचें ध्येय हिंसा हें नसून अहिंसा हेंच आहे असें ते समजतात. या अहिंसेच्या ध्येयासाठी राज्यसंस्था समूळ नष्ट करणे हेहि ते आपलें कर्तव्य मानतात. सर्व मानवकुलास अराजक अवस्था प्राप्त करून देणे हे त्यांचें ध्येय आहे. राज्यसंस्था निर्माण होण्यापूर्वीच्या मत्स्यन्यायाशी तुलना केली असतां राज्यसंस्थेखालीं अहिंसेचा विकास अधिक झालेला आहे हे खरे असले, तरी राज्यसंस्थेचे हिंसक स्वरूप कमी करीत नेणें व अखेरीस ती पूर्णपणे नष्ट करणे हेंच मनुष्यमात्राचें ध्येय आहे एके काळीं क्षात्रधर्माचा उदय झाला तो अहिंसेच्या प्रस्थापनेसाठीच झाला असला, तरी आज क्षात्रधर्माचा विकास करून त्याला सत्याग्रहाचें स्वरूप देणे अवश्य आहे असे ते म्हणतात; व हे करीत असतांना भगवद्गीतेंतील धर्मयुद्धाच्या उपदेशाच्या विरुद्ध आपण जात नाही, तर त्या धर्म-युद्धाच्या कल्पनेचा आपण अधिक विस्तार करीत आहोत असें ते प्रतिपादितात.

म. गांधी हे निरपेक्ष किंवा निरपवाद अहिंसावादी असले व या दृष्टीनें ते आत्यंतिक तत्त्वनिष्ठ किंवा ध्येयवादी असले, तरी दुसऱ्या एका दृष्टीनें ते अत्यंत व्यवहारकुशल आहेत. याचे मुख्य कारण म्हणजे त्याना आपल्या व जगाच्या अपूर्णतेची पूर्ण जाणीव आहे हेच होय. आपल्या स्वतःच्या मर्यादा ते ओळखतात व या गोष्टीचा नेहमी उच्चारहि करून दाखवितात. संपूर्ण अहिंसेचें व सत्याचें आचरण आज आपल्या हातून होत नाहीं हें ते जाणून आहेत. तथापि, याचा दोष ते जगाच्या अपूर्णतेवर सहसा लादीत नाहींत. अपूर्ण जगाला पूर्ण बनविणें हाच आपला धर्म आहे असें ते समजत असल्यामुळें जगाच्या अपूर्णतेकडे पाहून ते आपल्या अपूर्णतेचे समर्थन करूं इच्छीत नाहीत. अन्यायाचा प्रतिकार करण्याची त्यांची बुद्धि अहिंसा–वृत्तीइतकीच जागृत असल्यामुळें ज्यांना अहिंसेनें आपल्या-वर होत असणाऱ्या अन्यायांचा प्रतिकार करतां येत नसेल, त्यांनीं हिंसा-मार्गानेंहि तसा प्रतिकार केला तरीहि त्यांत शौर्य आहे, अशी त्यांची खात्री आहे. क्षात्रधर्मांतील शौर्यवृत्तीचा ते गौरव करतात व आपल्या सत्याग्रहाच्या धर्मयुद्धांत त्यांनीं या वृत्तीला अवकाश करून दिलेला आहे. आपल्या स्वातंत्र्याचें व स्वत्वाचें संरक्षण करण्याच्या कामीं देहपातापर्यंत स्वार्थत्याग करणें हें प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्य आहे, असा उपदेश ते सोदाहरण करीत असल्यामुळें लोकांतील स्वत्व, स्वाभिमान

आणि स्वार्थत्याग या वृत्ती ते असामान्य प्रमाणात जागृत करू शकतात प्राचीन निवृत्तिमार्गी साधुसंतांहून म. गांधीचा हाच विशेष आहे. ते केवळ अहिंसेचा व सत्याचा उपदेश करूनच थांबत नाहींत, तर जगांतील अन्यायाचें व पारतंत्र्याचें निवारण करण्याचा शांततेचा व सत्याचा मार्ग लोकांना दाखवून देऊन त्यात त्यांचें धुरीणत्व स्वतः स्वीकारण्यासहि पुढे सरसावतात, आणि त्या कामी व्यवहारज्ञ मुत्सद्या-इतकेंच, किंबहुना, त्याहूनहि अधिक यश संपादन करून दाखवितात. जगांतील सर्वच अन्याय, विषमता व पारतंत्र्य नष्ट करून सर्वत्र एकदम न्याय, समता व स्वातंत्र्य याची प्रस्थापना करणें शक्य नाही याची त्यांना पूर्ण जाणीव असल्या-मुळें स्वपरबलाबल अजमावून योग्य प्रसंगी योग्य तडजोडी करण्यासहि ते तयार असतात. कोणत्या प्रसंगी किती तडजोड करावी हें ओळखण्यास लागणारे व्यवहारकौशल्य त्यांच्या अंगी आहे. पण जगांतील रूढ व्यवहारात सुधारणा करण्यास लागणारे जनतेच्या अंगचे सामर्थ्य कसें वृद्धिंगत करावें हेहि ते जाणत असल्यामुळें रूढ व्यवहारापुढें त्यांना नेहमीच नमावे लागत नाही, तर रूढ व्यव-हाररूपी परिस्थितीला ते क्षणोक्षणी नमवीत असतात. जगांतील सर्व अन्यायाची, विषमतेची किंवा पारतंत्र्याची उभारणी सामान्य जनतेच्या अज्ञानावर, भीरुत्वावर, क्षणिक स्वार्थभावनेवर आणि सत्ताधाऱ्याशीं होणाऱ्या तिच्या सहकारितेवरच झालेली आहे, याची जाणीव म. गांधींना आहे. सामान्य जनतेनें संघटित होऊन शौर्यानें आपल्यावरील अन्यायाचा व जुलुमाचा प्रतिकार करण्याचा निश्चय केला, तर जगांतील सर्व जुलुमाचा प्रतिकार करणें अशक्य नाही, जनतेच्या या संघटित सामर्थ्यापुढें पृथ्वीवरील कोणत्याहि बलाढ्य सत्ताधाऱ्यांचे सामर्थ्य टिकूं शकणार नाहीं, अशी त्यांची श्रद्धा आहे व ती यथार्थ आहे.

जुलुमी सत्तेशीं असहकार आणि आज्ञाभंग यांचा उपदेश ते करीत असले, तरी जुलुमानें गांजलेल्यांना ते सहकारितेचे व शिस्तीचेच धडे देत असतात. लोकां-तील अत्याचार–प्रवृत्तीला ते कधीहि चालना देत नाहींत. यामुळें जगांत बेबंद-शाही माजून वाईटाबरोबर चांगल्याचीहि आहुति पडण्याची भीति या मार्गांत नाहीं. जुलुमी सत्ताधाऱ्याशी असहकार व त्याचा आज्ञाभंग हीं दोन सत्या-ग्रहाचींच अंगें आहेत आणि त्यांत विलक्षण सामर्थ्य आहे. हें सामर्थ्य प्रकट करून सत्य आणि अहिंसा या तत्त्वांना त्यांनी तपोबलाची जोड देऊन प्रभावशाली बनविलें आहे. हें तपोबल म्हणजेच त्यांची सत्याग्रहाची शिस्त होय. “शमप्रधानेषु

तपोधनेषु गूढं हि दाहात्मकमस्ति तेजः" या सिद्धान्ताचा अनुभव त्यांनी आज सर्व पृथ्वीवर प्रबल बनलेल्या जुलुमी साम्राज्यसत्तेस आणून दिलेला आहे. तसेंच सत्याचा विजय होण्याला तपश्चर्येची आवश्यकता आहे, हेंहि त्यांनीं तितक्याच स्पष्ट शब्दांत जनतेला शिकविलेलें आहे. जनतेचा पक्ष केवळ सत्पक्ष आहे एवढ्यावर तिचा विजय होणार नाही, तसें होण्यास तिनें उग्र तपश्चर्या केली पाहिजे

जगाचें आदिकारण केवळ ज्ञानमय किंवा केवळ प्रेममय नाही. ज्ञान, प्रेम आणि सामर्थ्य असें त्यांचें त्रिविध स्वरूप आहे. या त्रिविध स्वरूपांतून सत्य, अहिंसा आणि तपश्चर्या या तीन तत्त्वांचा उगम होतो. असत्य आणि सत्य, हिंसा आणि अहिंसा व शरीरबल आणि तपोबल यांचा लढा जगांत सर्वत्र दृष्टीस पडतो. सत्य, अहिंसा आणि तपश्चर्या यांना असत्य, हिंसा आणि पशुबल यांच्यावर विजय मिळावा अशी जगाची घटना आहे. प्राचीन क्षात्रधर्मात तपोबल शौर्याच्या रूपानें अंतर्भूत झालेलें होतें, परंतु त्याचा क्रौर्याशी सयोग झालेला होता. यामुळें कोणतेंहि युद्ध खरे धर्मयुद्ध होऊं शकत नसे. प्रत्येक युध्यमान पक्षांत शौर्य आणि क्रौर्य यांचा संयोग दिसत असल्यामुळें कोणता सत्पक्ष आणि कोणता असत्पक्ष याचा निर्णय देणें जवळजवळ अशक्य होत असे सत्याग्रह-संग्रामांत एका पक्षास शुद्ध शौर्य आणि दुसऱ्या पक्षास शुद्ध क्रौर्य असा देखावा दृष्टीस पडतो. निःशस्त्र वीराचें शौर्य सशस्त्र वीराहून श्रेष्ठ प्रतीचें असतें व निःशस्त्र वीरावर आघात करणाऱ्याचें क्रौर्य तितकेंच हीन असतें. शुद्ध शौर्य आणि शुद्ध क्रौर्य यांतील हा लढा पाहून मानवी अंतःकरणांत लपून बसलेला परमेश्वर प्रकट होतो आणि सत्पक्षाच्या बाजूला धांवून येतो, या श्रद्धेवर सत्याग्रहाची उभारणी झालेली आहे. विश्वांतील प्रत्येक अणुरेणूंत ज्ञान, प्रेम आणि सामर्थ्य हे गुण गूढ रूपानें वास्तव्य करीत असतात; आणि सत्य, अहिंसा व तपश्चर्या ही त्यांचीच रूपें असल्यामुळें त्यांना यश मिळावें अशीच विश्वाची घटना आहे, अशी श्रद्धा असणें व तदनुसार आचरण घडणें हाच आस्तिक्यवाद होय. ही आस्तिक्यभावना सत्याग्रहाच्या बुडाशीं आहे. सत्याग्रहाचा विजय होणें म्हणजे या आस्तिक्य भावनेचाच विजय होणे होय.

आज जगांतील सर्व देशांत संपत्ति आणि सत्ता यांची विषम विभागणी झालेली दिसते. प्रत्येक देशांतील एका अल्पसंख्य वर्गांत सर्व संपत्ति आणि सत्ता

संकलित झाली असून बहुसंख्य सामान्य जनतेला दारिद्र्य आणि दास्य यांच्या कर्दमांत नित्य रखडावें लागत आहे. ही विषमता नष्ट करून सर्वत्र स्वतंत्रता, समता व बंधुता यांची प्रस्थापना करणें हें आजचें धर्मकार्य झालेलें आहे. या तत्त्वांच्या प्रस्थापनेसाठीच फ्रेंच किंवा रशियन् राज्यक्रांत्या झाल्या. लोकसत्ता आणि समाजसत्ता या तत्त्वांचा उदयहि याच धर्मबुद्धीतून झालेला आहे. परंतु या राज्यक्रांतिकारकांनीं किंवा समाजक्रांतिकारकांनी हिंसेच्या साधनाचाच उपयोग केलेला असल्यामुळें अद्यापि स्वतंत्रतेचें, समतेचें व बंधुतेचें युग सुरू होऊं शकत नाहीं. म० गांधींनीं दरिद्रीनारायणाची उपासना करण्याचा जो धर्म प्रवृत्त केला आहे, त्याच्या बुडाशीहि हीच तत्त्वे आहेत. परंतु त्याचबरोबर सत्य, अहिंसा व तपश्चर्या याच साधनांनी ही साध्ये सिद्ध होऊ शकतील असें ते जगाला सांगत आहेत साध्यें जशी उच्च होऊं लागली त्याचप्रमाणे साधनेंहि उच्च झालीं पाहिजेत. वाटेल त्या साधनानें वाटेल तें साध्य प्राप्त करून घेतां येणार नाहीं. ज्यांना स्वतंत्रतेची लालसा आहे, त्यांनी शस्त्रसामर्थ्यानें दुसऱ्यावर सक्तीचा अंमल गाजवितां उपयोगी नाहीं. ज्यांना बंधुतेची प्रस्थापना करावयाची आहे, त्यांनीं हिंसेचा आश्रय करतां उपयोगी नाहीं. वैरभावनेंतून बंधुभावनेची आणि हिंसेंतून अहिंसेची प्रस्थापना करण्याचे प्रयत्न सफल होणार नाहींत हाच म. गांधींचा जगाला संदेश आहे.

सर्व जगांतील दरिद्री जनतेच्या अंतःकरणांत परमेश्वरी सामर्थ्य आहे. सत्य, अहिंसा आणि तपश्चर्या या साधनांनी हें सामर्थ्य प्रकट करतां येणें शक्य आहे. हें सामर्थ्य प्रकट झाल्यानें पुराणग्रंथांत वर्णन केलेल्या सत्ययुगाचा अवतार पृथ्वीतलावर होऊं शकेल.

नैव राज्यं न राजासीन्न च दंडो न दांडिकः।
धर्मेणैव प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥

असें सत्ययुगाचें वर्णन श्रीमन्महाभारतांत केलेलें आहे. सत्याग्रहाच्या साधनाचा अवलंब केल्यानें हें सत्ययुगाचें ध्येय गांठणें शक्य होऊं शकेल. आज पाश्चात्य देशांतील कम्युनिस्ट लोकानीहि या अराजक स्थितीचें ध्येय स्वीकारलेलें आहे; परंतु त्या ध्येयास अनुरूप असा सत्याग्रहाचा मार्ग मात्र अद्यापि ते स्वीकारीत नाहींत.

या कम्युनिस्टांखेरीज इतर कांहीं लोक विश्वबंधुत्वाच्या ध्येयानें प्रेरित होऊन

अहिंसेचा व शांततेचा उपदेश पाश्चात्य देशांत करीत आहेत. त्यांनीं शस्त्र-संन्यासाचें ध्येय पुढें ठेवलेलें असून कोणत्याहि युद्धांत सरकारशी सहकार्य करूं नये असा उपदेश ते आपल्या अनुयायांस करीत असतात. सत्याग्रही या नात्यानें म० गांधीचे ते अभिनंदन करतात. परंतु त्यांच्या कांही कृती व उक्ती यांसंबंधीं त्यांना कित्येक प्रसंगीं आश्चर्य वाटतें. म० गांधी जर अहिंसावादी आहेत, तर त्यांनीं महायुद्धाच्या प्रसंगी ब्रिटिश साम्राज्यासाठी सैनिकांची भरती कां केली याबद्दल त्यांना अचबा वाटतो. तसेंच मानव-समाजाला अराजक अवस्था प्राप्त करून देणें हें ध्येय ज्यानें स्वीकारले त्यानें हिंदुस्थान सरकारचें सैन्य हिंदी राष्ट्राच्या ताब्यांत आणण्याची खटपट कां करावी, याचाहि त्यांना उलगडा होणार नाही इतकेंच नाहीं, तर ब्रिटिशांनी हिंदुस्थानला समान दर्जाची भागीदारी दिली तर जगत्-कल्याणासाठी ब्रिटिशांशी खांद्यास खांदा लावून लढण्यासहि हिंदुस्थान तयार होईल, असें जें परवां गोलमेज-परिषदेत महात्माजींनी बोलून दाखविले, तेंहि या शांततावाद्यांना तितकेंसें पसंत पडणार नाही या ठिकाणींहि म० गांधी हे केवळ ध्येयवादी नसून व्यवहारज्ञ मुत्सद्दीहि आहेत हे ध्यानांत घेतलें असतां त्यांच्या कृतीचा उलगडा होऊं शकतो. एकाद्या राष्ट्रावर परचक्र आलें असतां त्याचे निवारण करण्याचा कोणताहि परिणामकारक मार्ग दाखवून न देतां केवळ सत्याचा व अहिंसेचा उपदेश करीत स्वस्थ बसणे हे खऱ्या लोकनायकाचे लक्षण नव्हे. कोणत्याहि अन्यायाचे निवारण झालेंच पाहिजे व ज्याच्यावर तो अन्याय होत असेल, त्यानें त्याचा प्रतिकार केलाच पाहिजे. सत्याग्रहाच्या साधनानें असा प्रतिकार करणें हा सर्वोत्तम मार्ग होय. परंतु ज्या राष्ट्रास किंवा व्यक्तिसमुदायास या मार्गानें जातां येत नसेल, त्यानें सत्य आणि अहिंसा या तत्त्वांचा केवळ जप करीत स्वस्थ बसतां उपयोगी नाहीं, तर अशा परिस्थितीत शस्त्र धारण करूनहि अन्यायाचे निवारण केले पाहिजे असें म० गांधींचें स्पष्ट मत आहे; आणि यांतच पाश्चात्य देशांतील शांततावाद्यांपेक्षां त्यांची व्यवहारज्ञता दिसून येते. हिंदुस्थानां-तील प्रस्थापित राजसत्तेच्या जुलुमांतून आपली मुक्तता सत्याग्रहाच्या मार्गानें कशी करून घ्यावी हें प्रत्यक्ष दाखवून देऊन त्या कामीं हिंदी लोकांची संघटना करून त्यांचे धुरीणत्व स्वीकारण्यास गांधीजी पुढें आले नसते, तर त्यांच्या शांततावादास आज हिंदी लोकांचा जो पाठिंबा मिळत आहे तो मिळाला नसता.

आज सत्याग्रहाच्या शस्त्राचा उपयोग प्रस्थापित राजसत्तेच्या जुलुमांतून प्रजेनें

कशी मुक्तता करून घ्यावी हें दाखविण्याच्या कामींच म० गांधी करीत आहेत. अद्यापि एकाद्या राष्ट्रावर एकदम आलेल्या परचक्राचें निवारण सत्याग्रहानें कसें करावें तें प्रत्यक्ष कोणीहि दाखवून दिलेलें नाहीं. सत्याग्रहानें परचक्रनिवारणाचें कार्य यशस्वी रीतीनें पार पाडतां येईल असें प्रतिपादन आपल्या ग्रथांतून बर्ट्रंड रसेल, विल्फिड् वेलॉक्प्रभृति कांहीं पाश्चात्य ग्रंथकारांनीं केलेलें आहे. परंतु या ग्रंथकारांच्या अंगीं ही गोष्ट प्रत्यक्ष करून दाखविण्याचे सामर्थ्य नाहीं व तितकी त्याची तपश्चर्याहि नाहीं. म० गांधींनाहि केवळ तात्त्विक दृष्ट्या सत्याग्रहानें कोणत्याहि राष्ट्रास आपलें परचक्रापासून संरक्षण करता येईल हे मान्य आहे; परंतु ही गोष्ट प्रत्यक्ष व्यवहारांत आपण आणूं शकूं असा आत्मविश्वास अद्यापि त्यांना वाटत नाही. अशी जोंपर्यंत त्यांची स्थिति आहे, तोंपर्यंत सर्व राज्यसंस्था नष्ट करणें किंवा कोणत्याहि एका राष्ट्रानें सर्वस्वीं शस्त्रसंन्यास करून सर्व मूळ नष्ट करणें अशा पायावर ते आपले व्यावहारिक राजकारण आंखणार नाहींत. अर्थात् तोंपर्यंत परचक्राच्या आक्रमणप्रसगीं ज्यांनी अहिंसावादाचा धर्म म्हणून स्वीकार केलेला नाही व जे तत्प्रीत्यर्थ तपश्चर्या करण्यास तयार नाहींत, त्यांनीं सशस्त्र सैनिक बनून आपल्या देशांतील प्रस्थापित राजसत्तेचें संरक्षण करण्यास पुढें आलें पाहिजे असाच ते उपदेश करतील हें उघड आहे. ही त्यांची व्यावहारिक दृष्टि समजून घेतली म्हणजे टॉल्स्टॉयसारख्या केवळ ध्येयवादी तत्त्वज्ञांहून म० गांधींचें श्रेष्ठत्व कोठें आहे तें दिसून येतें.

सत्य आणि अहिंसा हीं तत्त्वें निरपवाद आहेत असें जरी ते म्हणत असले, तरी आपलें सामर्थ्य व आपली तपश्चर्या हीं अपूर्ण आहेत याची जाणीव ते सदैव ठेवीत असतात. तसेंच या अपूर्ण जगांत या तत्त्वांची प्रस्थापना क्रमाक्रमानेंच होणार आहे याचीहि त्यांना जाणीव आहे. गेल्या सालीं सत्याग्रह-सग्राम सुरू करण्यापूर्वी एका सशस्त्र क्रांतिकारकाला उत्तर देतांना त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें होतें की, सत्याग्रहाच्या मार्गानें हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न तीन वर्षांत जर मीं सोडवूं शकलों नाहीं तर या शस्त्राचा उपयोग करण्यास मी अपात्र आहें, असेंच मी समजेन; व मग तुमच्या मार्गांत मी अडथळा उत्पन्न करणार नाहीं. दुसरा एकादा तत्त्वज्ञ असता तर तो हीच गोष्ट अन्य रीतीनें व्यक्त करता. सत्याग्रह यशस्वी करून दाखविण्यास माझी तपश्चर्या पुरेशी नाही असें न म्हणतां, सत्याग्रहानें स्वातंत्र्याचा प्रश्न सोडविण्याइतकी अद्यापि जगाची उन्नति झालेली नाहीं

असे उद्गार त्यानें काढले असते. म० गांधी असें कधीहि म्हणणार नाहीत. ते या सर्वांचा दोष आपणावरच ओढवून घेतात. माझ्या तपश्चर्येनें मी जगाला उन्नत करूं शकेन असा अमर्याद आत्मविश्वास त्यांच्या अंगीं वसत असल्यामुळें परिस्थितीच्या अपूर्णतेवर दोषारोप करून किंवा अहिंसा व सत्य या तत्त्वांनाच अपवाद आहेत असे म्हणून ते आपलें समाधान करून घेत नाहीत. असे केल्यानें प्रगतीला अवकाश रहात नाही. अपूर्ण जगांत पूर्ण मनुष्यासहि किंवा सिद्ध पुरुषासहि कित्येक प्रसंगी असत्याचा किंवा हिंसेचा अवलंब करावा लागतो असे म्हणण्यापेक्षां अपूर्ण जगांत कोणीहि पूर्ण असूंच शकत नाही, हा सिद्धान्त अधिक तर्कशुद्ध व उन्नतिकारक आहे. ज्याला अहिंसेनें, सत्यानें व तपश्चर्येनें दुष्टांचा निग्रह करतां येत नसेल, त्यानें आपलें अपूर्णत्व ओळखून व त्याला मान्यता देऊन हिंसेचा आश्रय करावा, केवळ परमेश्वराचा धांवा करीत स्वस्थ बसूं नये, असे म० गांधी म्हणतील. परंतु त्याचबरोबर पूर्वीच्या अवतारी लोकांनाहि दुष्ट-निग्रहा-करितां हिंसेचा आश्रय करावा लागला आहे म्हणून आपणहि तसेंच करावें किंवा ही हिंसाच नव्हे, असें म्हणण्यास ते केव्हांहि तयार होणार नाहीत. कारण तसें एकदां मान्य केलें, म्हणजे पूर्वी जितका अहिंसेचा व सत्याचा विकास झाला त्याहून तो अधिक होणे अशक्य आहे असेंच म्हटल्यासारखे होतें. जगाच्या प्रगतीला कायमची मर्यादा घालण्यास लोकनायकांनी केव्हांहि मान्यता देतां कामा नये. प्रत्येक लोकनायक जग अद्यापि अपूर्ण आहे म्हणून हिंसेचे व असत्याचे समर्थन करूं लागेल, तर अहिंसेचे व सत्याचे पूर्ण विकसन होणार तरी कसें?

हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सत्याग्रहाच्या मार्गानें म० गांधींनीं सोडविला, तर पुढे त्याच शस्त्राच्या साहाय्यानें शस्त्रसंन्यास करूनहि आपल्या राष्ट्राचे परकीय शत्रूं-पासून संरक्षण कसें करावें आणि प्रत्येक राष्ट्रांत समाजसत्ताक व्यवस्था कशी प्रस्थापित करावी, हे प्रश्न सोडविण्याचें कार्य सत्याग्रही-संप्रदायाच्या लोकांना करावें लागणार आहे. आज सर्व जगांतील लोक भौतिक साधनांच्या शोधांमुळे एकमेकांच्या अत्यंत निकट आलेले आहेत. अनेक अनोळखी लोकांना एका घरांत कोंडून घालावें तशी त्यांची स्थिति झालेली आहे. अशा स्थितींत विश्व-कुटुंबाची प्रस्थापना न होईल तर सर्व मनुष्यजातीचा संहार होण्यास फारसा काळ लागणार नाहीं. तसेंच युद्धाला जागतिक महायुद्धाचे व प्रत्येक देशांतील क्रांतीला जागतिक क्रांतीचे स्वरूप आतां प्राप्त होऊं लागलें आहे. शिवाय भौतिक

विद्येंतील प्रगतीमुळें मनुष्याचीं संहारसाधनेंहि कल्पनातीत वाढलेलीं आहेत. अशा परिस्थितींत भौतिक विद्येंतील ज्ञानवृद्धीमुळें आणि मानवकुलांतील निर-निराळ्या शाखांच्या सान्निध्यामुळे मानवकुलाचा, मानवसंस्कृतीचा अत्यंत विनाश व्हावयाचा असल्यास विश्वकुटुंबाची प्रस्थापना करण्याखेरीज गत्यंतर नाहीं. मानवकुलांतील सर्व संपत्ति व सर्व संस्कृति समाईक मालकीची समजून तिचा वारसा प्रत्येक पिढीतील सर्व व्यक्तींना समानतेनें प्राप्त झाला पाहिजे. बाल, रुग्ण आणि वृद्ध यांच्या पोषणाची, शुश्रूषेची, संगोपनाची व शिक्षणाची जबाबदारी सर्वांनीं समानतेनें उचलली पाहिजे. कोणाहि प्रौढ व सुदृढ व्यक्तीस अकष्टार्जित उत्पन्न मिळविण्याचे मार्ग मोकळे असूं नयेत व सर्वांनी समाईक संपत्तीत व संस्कृतीत भर घालण्याचे सारखेच प्रयत्न केले पाहिजेत, या तत्त्वांवर मानव-समाजाची संघटना होणे अवश्य आहे म० गांधीच्या अस्तेयाच्या कल्पनेंत या सर्व तत्त्वांचा समावेश होऊं शकतो. समाजाचे यज्ञचक्र चालू ठेवण्याच्या कामी स्वत: कष्ट न करतां समाजाच्या संपत्तीचा उपभोग घेणे आणि आपल्या नित्याच्या गरजांपेक्षां अधिक धनसंचय करणें, हें म० गांधींच्या अस्तेयाच्या व अपरिग्रहाचा तत्त्वांच्या विरुद्ध आहे. या दृष्टीनें विचार केल्यास म० गांधीचा आध्यात्मिक विश्वकुटुंबवाद पाश्चात्य देशांतील आधिभौतिक विश्वकुटुंबवादाहून अधिक श्रेष्ठ दर्जाचा आहे, अशी खात्री झाल्याखेरीज राहणार नाही विश्वकुटुंबाची प्रस्थापना होऊन सत्ययुगांतील अराजक अवस्था किंवा सर्वांगीण मुक्तावस्था मानवकुलास प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य सत्याग्रहाच्या साधनांतच आहे. मनुष्यसमाजाचे अंतिम ध्येय तेंच असून त्याच दिशेनें त्याच्या सर्व इतिहासाचा ओघ आजपर्यंत वहात आलेला आहे. आतांपर्यंत होऊन गेलेल्या सर्व धर्मसंस्थापकांनी याच दिशेनें मनुष्यसमाजाची प्रगति करण्याचा प्रयत्न केलेला आहे, व म० गांधी तेंच कार्य पुढे चालवीत आहेत. सत्य आणि अहिंसा या तत्त्वांना पूर्वीच्या धर्मसंस्थापकांनीं घातलेल्या मर्यादा आपण कायमच्या न समजतां एकसारखें पुढे जाण्याचा प्रयत्न करणें हे गांधीजी आपलें कार्य समजत असले, तरी आपणांसहि त्या तत्त्वांची पूर्णपणें प्रस्थापना करतां येणार नाहीं याची जाणीव ठेवून, जनतेच्या नित्य व्यवहाराचे एकेक प्रश्न हातीं घेऊन ते सोडवून दाखविण्यांत आपली व्यवहारनिपुणता आणि कार्यकुशलता हे गुण ते व्यक्त करीत असतात. यामुळें पूर्वीच्या धर्मसंस्थापकांच्या कार्या-बद्दल त्यांना पूर्ण आदर व अभिमान वाटतो. कृष्ण, बुद्ध, ख्रिस्त, किंवा महंमद

यांच्या कार्याकडे द्वैतदृष्टीनें ते पहात नाहीत. प्रत्येकानें आपापल्या परिस्थितींत एकच कार्य केलेलें आहे व तेंच कार्य आपणहि पुढें चालवीत आहोंत, अशी त्यांची भावना आहे आज जगांतील सर्व धर्मांचे अनुयायी त्यांना पूज्य मानूं लागले आहेत. ख्रिस्ती धर्मांतील व्यक्तीप्रमाणे महंमदी धर्मांतील व्यक्तीहि त्यांच्या तत्त्वांकडे आकर्षित होऊं लागल्या आहेत. सरहद्द-प्रांतांतील पठाणजातींत अहिंसा-तत्त्वाला धर्मदृष्टीनें मान्यता देणारा संप्रदाय निर्माण होणें याहून मोठा चमत्कार कोण करूं शकेल? अर्थात् म गांधींचा धर्म आज विश्वधर्म बनूं लागला असून **दरिद्रनारायणाची उपासना आणि सत्याग्रह** या तत्त्वाची सर्व जगभर प्रस्थापना होण्याचा काळ सध्यां आलेला आहे. याच दृष्टीनें म० गांधी हे आजचे जगद्गुरु व युगपुरुष आहेत असें आम्ही समजतों.

लोकशिक्षण :
ऑक्टोबर, १९३१

# तुरुंगांतील माझी विचारवाढ : : ८

माझें एकंदर जीवन विचारप्रधान आहे. चिंतन आणि चर्चा हे माझे नित्याचे व्यवसाय आहेत. लेखन आणि अध्यापन हे दुय्यम व्यवसाय आहेत. वर्तमानपत्रांत चालू विषयांवर सामान्य वाचकांसाठीं लिहिणे आणि ग्रंथांत अभ्यासू वाचकांसाठीं तात्त्विक विवेचन करणें या दोहोंत अंतर आहे. तसेंच एकाद्या महाविद्यालयांत अभ्यासक्रमासाठीं नेमलेले ग्रंथ शिकविणें आणि समाजांतील अनुभवी सार्वजनिक कार्यकर्ते एकत्र आले असतां त्यांच्यापैकीं कांहींना कांहीं विषयांचें ज्ञान हवें असेल तर तें करून देणें यातहि अंतर आहे. वर्तमानपत्रांतील चालू विषयांवरील लिखाणापेक्षां ग्रंथलेखनांत स्वतःच्या विचारवाढीचा आनंद अधिक उपभोगतां येतो; त्याचप्रमाणे महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना नियोजित ग्रंथ शिकविण्यापेक्षां समव्यवसायी, अनुभवी सार्वजनिक कार्यकर्त्यांपुढें समान पातळीवरून एकाद्या विषयावर व्याख्यानें देणें अथवा कांहीं ग्रंथांवर प्रवचनें करणें यात विचारवाढीचा आनंद अधिक चाखावयास मिळतो यांत शंका नाहीं. १९३० सालीं रत्नागिरीच्या तुरुंगांत सहा महिने, १९३२–३३ साली नाशिक तुरुंगांत पावणेदोन वर्षे आणि १९४२-४३–४४ या सालांत सुमारे तितकाच काळ येरवडा तुरुंगांत मीं काढला. यांपैकीं प्रत्येक अवधींत मला माझ्या वरील व्यवसायामुळें विचारवाढीचा आनंदी अनुभव चाखतां आला.

## विचारांची संथ वाढ

माझ्या विचारांची वाढ भावनोद्रेकानें होत नसून चिंतन व चर्चा या मार्गांनीं

होत असल्यानें तिच्यांत एक प्रकारचा संथपणा दिसून येतो गेल्या पंचवीस-तीस वर्षांत माझ्या विचारात बरीचशी वाढ झाल्याचे मला दिसून येतें; तथापि त्यांत एकदम अनपेक्षित उलथापालथ अथवा आमूलाग्र विचारपरिवर्तन झाल्याचा मला कधी अनुभव आलेला नाही प्रत्येक वेळी कोणत्याहि नवीन विचाराचा स्वीकार करतांना त्याचे मनाशी चिंतन व समव्यावसायिकांशी चर्चा करून मग ग्रहण करावयाचें आणि आपल्या आजपर्यंतच्या विचारांशी त्याची तुलना करून पाहावयाची अशी वृत्ति माझ्यांत असल्यानें मी लिहूं लागल्यापासून आतांपर्यंतच्या सर्व लिखाणांतून विचाराचा एक धागा असल्याचे कोणाहि वाचकास दिसून येतें हा माझ्या विचार-प्रधान प्रकृतीचा परिणाम आहे. तुरुंगांतील जीवन हें बाहेरच्या नित्याच्या व्यवसायांतील व्यवहारापासून सक्तीनेंच तोडलेलें असल्यानें माझ्यासारख्या संथ वृत्तीच्या मनुष्याच्या विचारातहि थोडी अधिक जलद विचारवाढ होणे अगदी साहजिक आहे त्यातून मी ज्या ज्या वेळी तुरुंगांत होतों त्या त्या वेळी बाहेर क्रांतिकारक चळवळी चालू असल्यानें त्या चळवळीच्या आंदोलनांचा परिणाम माझ्याहि विचारावर होणे अपरिहार्यच होतें अर्थात् प्रत्येक वेळी तुरुंगांत जातांना माझे जे विचार होते, त्याचे स्वरूप मी बाहेर आलों त्या वेळी बरेच पालटलेले अथवा वाढलेले मला आढळून आलेलें आहे. १९४२-४३-४४ या वर्षांतील तुरुंगवासात हाच अनुभव मला अधिक प्रमाणांत आला. कारण, या काळातील राष्ट्रीय आंदोलनाचे स्वरूपहि पूर्वीच्या काळांतील आंदोलनाहून फार मोठें होतें. राष्ट्राच्या आणि राष्ट्रसभेच्या जीवनांत या आंदोलनानें एक नवे युग निर्माण केले आहे. गेल्या पंचवीस वर्षांत राष्ट्राची जी वाढ झाली, तिच्याहून अधिक प्रभावी आणि अधिक त्वरित अशी वाढ होण्याचा काळ आतां आला आहे. राष्ट्रसभेच्या जीवनांत एक नवें युग आज सुरू होत आहे, याचा अनुभव १९४२ च्या ऑगस्ट ९ ला–ज्या आम्हांस तुरुंगांत नेऊन ठेविलें त्यांना–तुरुंगांत असतांना हरघडीस येत होता. या अनुभवाचा परिणाम इतरांप्रमाणें माझ्याहि विचारवाढीवर होणें साहजिक व अपरिहार्य होतें; आणि तो तसा झालाहि.

## हिंसा-अहिंसेच्या मर्यादा

ऑगस्ट ९ ला आम्हांस येरवड्यांत नेऊन कोंडले. मी इस्लामपुरास होतों. तेथून सातारा जिल्ह्यांतील इतर दहा मंडळीच्याबरोबर मोटारीतून नेऊन संध्याकाळीं साताच्या सुमारास आम्हांस येरवड्यांत नेऊन ठेवण्यांत आलें. पहिले चार महिने मी

जेथें होतों तेथें माझ्याबरोबर साताऱ्याहून आलेले दहा लोक, मुंबईचे पचवीस-तीस लोक व पुण्याचे दोन-तीन लोकच होते. सात-आठ दिवस गेल्यानंतर आमचें अध्यापन-कार्य सुरू झालें हें कार्य तुरुगांतील माझ्या वास्तव्यांत प्रकृति बरी असली म्हणजे सतत चालू असे. महाराष्ट्रांतील इतर लोक आमच्यापासून दूर होते पुढे नोव्हेंबर-अखेर आम्ही जवळजवळ दोनशें स्थानबद्ध लोक रेफरमेटरींत येऊन राहिलों. तेथें सर्व महाराष्ट्रांतील अनेक लोक एकत्र आलों. अर्थात् अध्यापनकार्यासहि अधिक व्यापक स्वरूप आले समाजवाद व गांधीवाद यांचा तुलनात्मक अभ्यास करणारे लोक मजकडे येत असत मार्क्सवादावरील पुस्तकें मी शिकवीत असें व तीं शिकवितांना सत्याग्रही दृष्टीनें त्यांतील प्रत्येक सिद्धान्तावर काय म्हणतां येईल त्यासंबधीं चर्चा करीं या कार्याकडे मी स्वतःच्या विचारवाढीच्या दृष्टीनें पाहत असें व दररोज कांहीतरी नवीन भर पडत आहे असा अनुभव येत असे. मार्क्स-वादाची व गांधीवादाची चर्चा करतांना विश्वघटनेपासून समाजघटनेपर्यंत व वेड्याच्या मानसशास्त्रापासून स्थितप्रज्ञाच्या आत्मानुभवापर्यंत सर्व विषयांना स्पर्श करावा लागे. तथापि, माझा प्रमुख विषय राज्यशास्त्र, राज्यक्रांति व समाजाची आर्थिक घटना हाच प्रायः असे. राज्य चालवितांना, राज्य सुधारतांना, राज्यक्रांति करतांना अहिंसावाद आणि हिंसावाद यांचे दृष्टिकोन कसे भिन्न असतात, अहिंसेच्या व्यावहारिक मर्यादा कोणत्या आणि हिंसेच्या तात्त्विक मर्यादा कोणत्या, तत्त्वज्ञान व व्यवहार यांचे संबंध काय आहेत आणि तात्त्विक निष्ठा व व्यवहारनैपुण्य यांचा समन्वय कसा साधतां येतो, हे विषय नित्य चर्चिले जात. गांधीवाद हें व्यवहारपराङ्मुख तत्त्वज्ञान नाही आणि समाजवाद हा ध्येयशून्य वास्तववाद नव्हे, हा मुद्दा मी वारंवार लोकांपुढें मांडीत असें. आजपर्यंत हिंदी राज्यक्रांतीला प्रत्यक्ष सुरवात झाली नव्हती; आतां तसा प्रत्यक्ष प्रारंभ झाला आहे. आजपर्यंत समाजवादी व गांधीवादी क्रांतीची पूर्वतयारी करीत होते, आतां ते प्रत्यक्ष क्रांति करूं लागले आहेत. क्रांतीच्या पूर्वतयारींत गांधीवादी व समाजवादी यांचे सहकार्य टिकणें इष्ट आणि अवश्य आहे, असें मी आजपर्यंत प्रतिपादीत असें. त्याचप्रमाणें हें त्यांचें सहकार्य क्रांतिकालांत टिकण्याचीहि आवश्यकता आहे असे माझें मत मीं पूर्वीहि अनेक वेळां सूचित केलें आहे. पण त्याचें अधिक स्पष्टीकरण मला आतां करावें लागलें.

१९४२ च्या लढ्यांत दोन दृश्यें अगदीं स्पष्टपणें जगाच्या निदर्शनास आलीं.

केवळ तात्त्विक दृष्टीनें विचार करण्याची ज्यांना संवय आहे त्यांना तीं मानसिक दृष्टीनें पूर्वींहि न्याहाळतां आलीं असली, तरी त्यांचे प्रत्यक्ष दर्शन १९४२ च्या ऑगस्टनंतर झालें. पहिलें दृश्य असे, की आंतरबाह्य दडपणानें आपलें राज्ययंत्र कोसळून पडणार असें दिसले तर त्या राज्ययंत्राला प्रत्यक्ष कोसळू न देतां हिंदी जनतेच्या पुढाऱ्यांच्या हाती तें देण्यास दूरदर्शी स्वार्थबुद्धीनें ब्रिटिश राज्यकर्ते तयार होतील, ही आशा चर्चिल-मंत्रिमंडळानें भगून टाकली. जागतिक लोकमत आणि दोस्तांचा सल्ला यांमुळें तरी हें शहाणपण त्यांना सुचेल, असा शेवटचा आशातंतु म. गांधींचें प्रायोपवेशन व फिलिप्सचा अधिकृत वृत्तान्त होऊन जाईपर्यंत टिकून होता, पण फिलिप्स येथून जाताना म गाधींची भेट त्यांना नाकारून चर्चिल-मत्रि-मंडळानें तोहि तोडून टाकिला, अर्थात् हिंदी राज्यक्रांति संपूर्ण सफल होण्यापूर्वी एक राज्ययंत्र कोसळून दुसरें राज्ययंत्र निर्माण होण्यापर्यंतच्या संधिकालीन अवस्थेंतून राष्ट्राला जावें लागणार आहे, हें अनेकांना स्पष्टपणे दिसूं लागलें. १९२० सालापासून १९३० सालापर्यंतच्या काळांत मला हें दृश्य अपरिहार्यच वाटत असे; पण १९३१ मध्यें गांधी-अर्विन करार झाल्यानंतर मलाहि हें दृश्य परिहार्य होऊं शकेल असें वाटूं लागलें. म्हणजे क्रांतिपूर्व अराजक सधिकालांतून न जातां हिंदी राज्यक्रांतीचा प्रश्न ब्रिटिशाच्या दूरदर्शी स्वार्थानें सुटूं शकेल असें मला वाटूं लागलें. ९ ऑगस्ट १९४२ नंतरच्या घडामोडी सुरू झाल्यानंतर हळूहळू ही आशा नष्ट होऊं लागली, व फिलिप्स येथून निघून गेल्यानंतर ती पार मावळली!

याच काळांत आणखी एक अधिक महत्त्वाचें दृश्य हिंदी राजकीय क्रांतिकार-कांच्या व जगांतील विचारवंतांच्या दृष्टीस पडलें. देशांत अराजक माजेल किंवा वर्गविग्रह माजेल अशी भीति असल्यास म गांधी आपला सत्याचा आग्रह ऐन-वेळीं सोडून देतील व ते प्रतिक्रांतिकारक बनतील, अशी अनेकांना भीति अथवा आशा वाटत असे. म. गांधींनीं ' चले जाव ' ची घोषणा करून ही भीति अथवा आशा निराधार आहे हें स्पष्टपणे दाखवून दिलें. हें दृश्य हिंदी क्रांतिकारकांना उत्साहजनक वाटलें, तसेंच ब्रिटिश साम्राज्यनिष्ठांना व मुत्सद्द्यांना उद्वेगजनक वाटलें. मला या दृश्यांत अनपेक्षित असें कांहींच नव्हतें. कारण, मी हें मत तात्त्विक-दृष्ट्या अनेकांपुढे मांडीत असें. पण तसें म्हणण्यास प्रत्यक्ष पुरावा मला देतां येत नसे. तो पुरावा या दृश्यानें मला उपलब्ध झाला. यामुळें क्रांतिपूर्व संधिकालांतील समाजवादी व सत्याग्रही यांच्या परस्पर-सहकार्याचें, श्रमविभागाचें व कार्यपूर्ततेचें

जें तात्त्विक विवेचन मी करीत असें, तें बहुतेकांना–म्हणजे माझ्या श्रोत्यांपैकीं बहुतेकांना–पटत असे. सत्याग्रही व समाजवादी या दोन्ही पक्षांनी परस्परांचें महत्त्व ओळखून हिंदी क्रांतीचे कार्य पुरे केलें, तर त्या दोघांच्या सहकार्यानें हिंदुस्थानांत सत्याग्रही समाजवाद निर्माण होऊन समाजसत्ताक लोकशाहीची संस्थापना होऊं शकेल, या माझ्या सिद्धान्तांतील अनेक सूक्ष्म प्रश्नांची चर्चा मला करतां येत असे. या चर्चेपासून माझ्या विचारवृद्धीस निश्चित साहाय्य झालेलें आहे. तुरुंगातून बाहेर आल्यापासून मीं जें थोडेंफार लेखन केले आहे, त्यांत कायद्याची मर्यादा सांभाळून मला या नव्या विचारांचे जेवढें स्पष्टीकरण करता आलें तितकें केलें आहे. यापुढील राजकारणांत या स्पष्टीकरणासाठी लिहिलेल्या मुद्द्यांना बरेच महत्त्व प्राप्त होईल असें मला वाटतें. गेली पंचवीस वर्षें अहिंसक क्रांतीच्या भावनेला मूर्त स्वरूप देण्याचा जो प्रयत्न राष्ट्रसभेने केला, त्या प्रयत्नाचें समग्र निरीक्षण करून या मुद्द्यांचा व्यावहारिक व तात्त्विक दृष्टीनें निर्णय करणें राष्ट्रसभेच्या भावी विकासास आज अत्यंत अवश्य झालेले आहे. व्यावहारिक राजकारणाच्या दृष्टीनें आपण आतां क्रांतिपूर्व युगांतून क्रांतियुगांत पदार्पण करीत असल्यानें जे मुद्दे माझ्या आजपर्यंतच्या लिखाणांत पुढील काळचे म्हणून मुग्ध ठेवण्यांत आले होते, ते अधिक निकटचे बनल्यानें त्यांचें स्पष्टीकरण करण्यास महत्त्व प्राप्त झालें आहे हें करतांना हिंसामार्गाच्या तात्त्विक उणिवा व मर्यादा आणि अहिंसामार्गाच्या व्यावहारिक मर्यादा याची चर्चा करावी लागते त्या चर्चेची संधि गेल्या तुरुगवासांत मला जशी लाभली, तशी पूर्वी कधीहि लाभली नव्हती.

### अध्यात्म आणि समाजवाद

तुरुंगांत गीता, उपनिषदे आणि ज्ञानेश्वरी यांचें वाचन करणारे बरेच लोक असतात; तसे ते या वेळींहि आमच्यांत होते व त्यांचे वर्गहि चालू होते. तसेंच केवळ मार्क्सवादाचें अध्ययन करणारे व ते वर्ग चालविणारेहि आमच्यांत होते. माझ्या वर्गांत या दोनहि विषयांची चर्चा चाले. मार्क्स-एंजल्सचा विरोध विकासी भौतिकवाद ( Dialectical Materialism ) आणि शंकराचार्य, हेगेल यांचा आध्यात्मिक अद्वैतवाद यांचा खूप खल व्हावयाचा. विशेषतः सिडने हुक यांचें From Hegal to Marx आणि मि. ऑसबोर्न यांचें Freud and Marx हीं पुस्तकें शिकवितांना या विषयांचा सारखा काथ्याकूट होत असे. मार्क्सचा

विरोध-विकासी भौतिकवाद हा यांत्रिक भौतिकवादाहून भिन्न आहे; यामुळें त्यांत बुद्धिस्वातंत्र्य ( Free will ), नैतिक ध्येयवाद ( Ethical Idealism ) आणि कर्मयोगी आत्मानुभव याना भरपूर अवसर आहे, किंबहुना, त्याना त्यांत विरोधी असें कांहीं नाहीं असें माझें प्रतिपादन असे. भौतिक जग हा केवळ बुद्धिभ्रम नाहीं, त्याचे अस्तित्व आभासिक नसून वास्तविक आहे, यावर मार्क्स-वादाचा कटाक्ष आहे जगाचें आदिकारण भौतिक आहे म्हणजे सजीव व सचेतन सृष्टि भौतिकांतूनच कालक्रमदृष्ट्या निर्माण झाली आहे, हें मार्क्स-वादाचे मत आजच्या शास्त्रीय संशोधनास अनुसरून असेंच आहे व तें कोणत्याहि बुद्धिवादी मनुष्यास आज तरी नाकारून चालणार नाहीं, हें माझे मत मी सांगत असें. तसेंच, भौतिक तत्त्व हें द्रव्यरूप नसून ती एक शक्ति ( Not matter, but energy ) आहे व जी जड द्रव्यें अथवा जड पदार्थ किंवा वस्तू आपण पाहतों तो सर्व या भौतिक शक्तीचाच आविष्कार आहे आणि या शक्तीच्या सागरांत उठलेले ते असंख्य तरंग आहेत, असें भौतिक शास्त्र आज सांगत असून या शास्त्रज्ञाना भौतिक नियतीवाद ( Material Determinism ) आज सिद्ध करतां येत नाही व म्हणून त्यांच्यापैकीं काहीनीं तो सोडूनहि दिला आहे, या मुद्द्यावर मी विशेष भर देत असें

भौतिकवादांतील नियतीवाद हा बुद्धिस्वातंत्र्याला मारक असून नैतिक ध्येय-वादाशींहि तो विसंगत आहे. तसेंच मार्क्सचा भौतिकवाद हा स्वयंविकासाचें तत्त्व मान्य करून कारणाहून अधिक गुण कार्यांत येऊ शकतात, हें तत्त्व मान्य करीत असल्यानें भौतिकातून सजीव सृष्टि आणि जीवसृष्टीतूनच मानवसृष्टि निर्माण होतात असें सांगूनहि ' जड सृष्टीचे नियम जीवसृष्टीचे व्यापार समजण्यास पुरे पडत नाहींत आणि मानवेतर जीवसृष्टीचे नियम मानवसृष्टीचे व्यापार उलगडण्यास पुरे पडणें शक्य नाहीं ' असें आग्रहानें सांगूं शकतो– किंबहुना, तसें सांगणें हें त्याचें कर्तव्यच बनतें. यामुळें त्याचें समाजशास्त्र यांत्रिक भौतिकवादी व जड नियती-वादी समाजशास्त्रज्ञांच्या शास्त्रांहून कसें व कोठें भिन्न झालें आहे, तें मी वेळोवेळीं दाखवून देत असें. तसेंच, जी शक्ति भौतिक विषयांत प्रकाश, उष्णता, ध्वनि, विद्युत् या रूपांनीं प्रकट होते, तीच शक्ति मानवी बुद्धींत ज्ञानाची, अंतःकरणांत प्रेमाची व संकल्पांत तपश्चर्येची प्रेरणा निर्माण करते, असें मानण्यांत मनुष्याला कमीपणा वाटण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. माकडापासून मनुष्याची उत्पत्ति झाली

या सिद्धान्ताविरुद्ध भांडण्यांत जसे ख्रिस्ती भटजींना यश आलें नाही, तसेंच केवळ भौतिकांतून जीवसृष्टि व जीवसृष्टीतून मानवसृष्टि निर्माण झाली या सिद्धान्ताशी हुज्जत घालण्यात अध्यात्मवाद्यांना यश येणार नाहीं, असें मी मान्य करी. पण खरा महत्त्वाचा मुद्दा हा आहे, की मानवी मनाचे व बुद्धीचे व्यापार केवळ भौतिक नियतीनें नियत झालेले आहेत किंवा नाहीत आणि मानवनीति ही पशुनीतीहून भिन्न आहे किंवा नाहीं, हा आहे. साख्यशास्त्राप्रमाणें आधुनिक भौतिकवाद सत्कार्यवादी होता व म्हणून तो कार्यांत कारणाहून अधिक गुण येऊ शकतात हे मान्य करीत नसे यामुळें जड द्रव्यानी बनविलेल्या यंत्राचे व्यापार जसे पूर्वनियत असतात, तसेच प्राण्यांचे व मानवांचे शारीर व मानस व्यापारहि पूर्वनियत व यांत्रिक स्वरूपाचेच आहेत असें मानी जड धातूंपासून बनविलेलें घड्याळ, प्राण्याचें शरीर आणि मानवी मन व मेंदु यांच्या व्यापारांत प्रकारभेद आहे, हे मानल्यावांचून नीतिशास्त्राला आधारच मिळत नाही हा प्रकारभेद लक्षांत घेऊन सांख्यांनी प्रकृतीपासून सर्व सृष्टीचा विकास झाला हे तत्त्व मान्य करूनहि आत्मा किंवा पुरुष हें दुसरे तत्त्व गृहीत धरलें हा प्रकारभेद न मानणारा यांत्रिक भौतिकवाद मार्क्सनें सोडून देऊन आपला विरोध-विकासी भौतिकवाद मांडला; यामुळें भौतिक शक्तीतूनच मानसिक किंवा आत्मिक शक्ति विकास पावते असें मान्य करूनहि मानवी मनोव्यापार आणि बुद्धिव्यापार यांची चर्चा करतांना त्याला नियतीवादाचा आश्रय करण्याचें कारण नाही. तत्त्वज्ञानांतील हा एक निराळाच वाद असून हेगेलचा जडाद्वैतवाद आणि शंकराचार्यांचा चिद्द्वैतवाद याहून हा भिन्न आहे. स्पेन्सरच्या अज्ञेयवादाहूनहि तो भिन्न आहे. स्पिनोझाच्या तत्त्वज्ञानात त्याचा उगम असला, तरी स्वयंविकासाचें व विरोध-विकासाचे तत्त्व त्यांत अतर्भूत झाले असल्यानें तो त्याच्या चिदचिद्विशिष्ट अद्वैत सिद्धांताहूनहि भिन्न आहे. अशा या महत्त्वाच्या तात्त्विक सिद्धांताचें निःपक्षपाती विवेचन धंदेवाईक तत्त्वज्ञान्यांनी अद्यापि केलेलें नाही या सिद्धांतांत माझ्या मतें एकच उणीव आहे व ती म्हणजे आत्मानुभव किंवा धर्मानुभव ( Religious experience ) असें ज्याला म्हणतात त्या अनुभवाच्या पुराव्यापासून निघणारी अनुमानें त्यानें आत्मसात् केलेलीं नाहीत. तशी तीं केल्यावांचून त्याची धर्ममीमांसा पुरी व यथार्थ होणार नाही हें माझें मतहि मी सांगत असे. यासंबंधींच्या माझ्या मतांत गेल्या तुरुंगवासांत बरीच वाढ होऊन स्पष्टता आलेली

आहे. अर्थात् हें माझें मत आहे. या विषयावर एकादें पुस्तक लिहून तें विद्वानांपुढें मांडल्यावांचून माझ्या या मताची कसोटी लागणार नाही. येथें एवढेच नमूद करावयाचे आहे, कीं अध्यात्म व समाजवाद यांचा समन्वय साधण्या-संबंधींचे माझे विचार तुरुंगांतील चिंतनानें व चर्चेनें अधिक स्पष्ट व दृढहि झाले आहेत

## निरीश्वरवादी धर्म

धर्मविषयक विचारांच्या बाबतींत माझी आणखी एका दृष्टीनें प्रगति झाली आहे असें मला वाटतें. ईश्वरवाद व परलोकसिद्धान्त हाच धर्माचा गाभा आहे हें मत मला पूर्वींहि मान्य नव्हतें. जैन व सांख्यदर्शनें उघडपणें निरीश्वरवादी आहेत आणि बौद्ध-दर्शन अज्ञेयवादी आहे; तरीहि ते धर्म व मोक्ष हे पुरुषार्थ मानतात हें मी प्रो. फडके यांना ‘ पुरोगामी साहित्य ’ या विषयावरील वादांत उत्तर देतांना स्पष्ट केलेंच होतें. यासंबंधी माझे विचार आतां अधिक स्पष्ट व निश्चित झाले असून निरीश्वरवादी धर्मासंबंधीं एक स्वतंत्र पुस्तकच लिहिण्याचा विचार माझ्या मनांत अलीकडे घोळत आहे. आत्मानुभवाचा सर्व पुरावा गृहीत धरूनहि ईश्वर-वाद सिद्ध होत नाहीं असें माझें मत बनलें आहे. शंकराचार्यांच्या प्रकरण-ग्रंथांतील अनेक श्लोकांत जीवन्मुक्त मनुष्य निरीश्वर बनूं शकतो, असे उल्लेख आहेत. ‘ आधुनिक भारत ’ या माझ्या पुस्तकांत अखेरच्या प्रकरणांत मीं तसा एक श्लोक दिलेला आहे. तसेंच त्या पुस्तकाच्या सातव्या प्रकरणाच्या शिरोभागीं आगरकरांचा एक उतारा दिला आहे त्यांत ते म्हणतात:—

“ आकाशांतून देव येथें कधीं आले नाहींत व येथून परत कधीं गेले नाहींत. आम्हीच त्याना येथल्या येथें निर्माण करतो, त्यांच्या गुणांचे पोवाडे गातों आणि चाहील तेव्हां त्यांस नाहींसे करतों. जों जों बुद्धीचा विकास होत जाऊन कार्य-कारणाचा संबंध चांगला कळूं लागतो, तों तों प्राथमिक व पौराणिक कल्पना मिथ्या भासूं लागून भूतपिशाच्च, देवदानव वगैरे शुद्ध कल्पनेनें उत्पन्न केलेल्या शक्तींची असत्यता प्रत्ययास येते, पूजेस आणि प्रार्थनेस ओहोटी लागते आणि कांहीं वेळ सर्व ब्रह्मांडास उत्पन्न करून त्याचें परिपालन आणि नाश करणाऱ्या एका परमात्म्याच्या कल्पनेचा उदय होतो. पण पुढें वेदान्तविचाराच्या कुंडांत पेटलेल्या अग्नींत हें द्वैतहि खाक होऊन जातें आणि ‘ अहं ब्रह्माऽस्मि ’ एवढा अनिर्वचनीय विचार मागें राहतो ! व्यक्तीच्या व राष्ट्रांच्या धर्मविचारांचा हा कळस आहे. ”

आगरकरांच्या या उद्गारांत मला पुष्कळच अर्थ दिसतो. “अहं ब्रह्मास्मि” हा एक विचार आहे एवढें म्हणून मात्र काम भागणार नाहीं. तो एक अनुभव आहे व या अनुभवाला व्यक्त करण्यासाठीं ते शब्द उच्चारलेले आहेत. “अहं ब्रह्मास्मि” या शब्दांनी शांकरवेदान्ती जो आत्मानुभव व्यक्त करतात, तोच अनुभव बौद्ध व जैन दर्शनांत निर्वाणपद किंवा अर्हतपद या शब्दांनीं व्यक्त होत असतो. गीतेंत स्थितप्रज्ञावस्था, ब्रह्मनिर्वाणपद या शब्दांनीं तोच अनुभव व्यक्त झालेला आहे. सर्व धर्मांचें अंतरंग या अनुभवांत अथवा अंतरंग-क्रांतीत सामावलेलें आहे. सत्यनिष्ठ बुद्धि, प्रेममय अंतःकरण आणि तपःशुद्ध आचरण हें सर्व धर्मांतील अंतरंग-क्रांतीचें ध्येय असून याची प्राप्ति सर्व समाजाला करून देण्यासाठीं निरनिराळ्या समाजधारणापद्धती निरनिराळ्या धर्मांनीं निर्माण केलेल्या आहेत. या समाजधारणांचा धर्म युगायुगानुसार बदलत असतो. समाजधारणा होण्यासाठींच जुन्या समाजपद्धती मोडून नव्या समाजपद्धती स्थापाव्या लागतात. आज समाजवाद हा अशीच क्रांति करू पाहत आहे व त्या दृष्टीनें त्यानें जी समाजवादी पद्धति शोधून काढली आहे तिला मी युगधर्म मानतों. आज हा युगधर्म क्रांतिरूप बनला आहे.

या क्रांतीनंतर त्याला समाजधारणेचेंच कार्य करावयाचें आहे. पण या कार्याची खरी सिद्धि व परिपाक होण्यास त्याला अंतरंग-क्रांतीच्या सनातन धर्माचीहि उपासना करावी लागणार आहे. या सनातन धर्माचें आधुनिक स्वरूप म. गांधींच्या सत्याग्रहांतून जगापुढें येत आहे. या सनातन सत्याग्रही धर्माच्या व समाजवादी युगधर्माच्या सहकार्यानेंच मानव-संस्कृतीचा भावी विकास होणार आहे असें माझें मत आहे. बुद्धि सत्यनिष्ठ बनवावी, अंतःकरण प्रेममय बनवावें आणि आचरण तपःशुद्ध ठेवावें या मनुष्याच्या अंतःकरणांतील सनातन वृत्ती आहेत. या सनातन वृत्तींना आजच्या समाजधारणेंत अवसर नाहीं म्हणून त्याच वृत्ती आज क्रांतिकारक बनल्या आहेत. मार्क्सनें समाजधारणा करणाऱ्या धर्माचें क्रांतिकारक स्वरूप जगापुढें मांडलें; त्याच वेळीं रशियांत मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या व अंतरंग-क्रांति करणाऱ्या ख्रिस्ती धर्माचें क्रांतिकारक स्वरूप टॉल्स्टॉयनें जगापुढें मांडलें. ख्रिस्ती धर्मांतील ईश्वरवादासंबंधींची आग्रही वृत्ति क्रांतिवृत्तीला पोषक नसून तिला मारक बनेल या भीतीनें लेनिननें व त्याच्या अनुयायांनीं निरीश्वरवादाची ध्वजा उभारली. तसें करतांना धर्म व मोक्ष या पुरुषार्थांवरहि हल्ले चढवले आणि अध्यात्म व अंतःप्रेरणा यांच्याकडे दुर्लक्ष

केलें. समाजवादी समाजघटना व समाजसत्ताक क्रांति यांत त्यामुळें उणीव राहिलेली आहे. सत्याग्रही तत्त्वज्ञानानें सत्यनिष्ठा व अहिंसावृत्ति यांचे क्रांतिकारक स्वरूप प्रकट करून ही उणीव भरून काढण्याचा मार्ग दाखविला आहे. इतकेंच नाहीं, तर समाजसत्ताक क्रांतिकालांत निर्माण होणारें अनियंत्रित एकपक्षसत्ताक राज्ययंत्र लोकसत्ताक बनविण्याचा मार्गहि दाखवून दिला आहे तसेंच, समाजसत्ताक राज्ययंत्रहि अखेरीस गळून पडावें आणि सर्व प्रकारच्या आंतरबाह्य बंधनांतून मुक्त होऊन सर्वांगीण मुक्तावस्था सर्व समाजाला प्राप्त व्हावी, ही आकांक्षा सफल करण्याचा मार्गहि सत्याग्रहानें जगाला दाखवून दिला आहे असे क्रांतिकारक अहिंसावादी सत्याग्रही जितके निघतील, तितकी जगांतील राजकीय हिंसा कमी कमी होत जाईल व राज्यसंस्था चालविण्यास किंवा एक राज्ययंत्र मोडून त्या ठिकाणीं दुसरें उभारण्यास हिंसेची आवश्यकता उरणार नाहीं जागतिक युद्धें व जागतिक क्रांति या मिषानें हिंसा करण्याचा प्रघात हा प्रतिगामी, किंबहुना, रानटीहि मानण्यांत येईल. या काळांतील इतिहास हा मनुष्याच्या पशु-अवस्थेंतील इतिहास गणला जाईल व या पशुसमाजांत निर्माण झालेल्या बुद्ध-ख्रिस्त-गांधी इत्यादि मानवांना भावी मानवांचे पूर्वावतार मानण्यांत येईल. जितके अधिक लोक ही सत्याग्रही दीक्षा घेतील, तितके हे मानवयुग सन्निध येईल. पण ही सत्याग्रही दीक्षा म्हणजे सुळावरील पोळी आहे हें ओळखलें पाहिजे. संग्रहबुद्धि, सत्तालोभ आणि असंयमी वृत्ति यांच्या आहारी जाणारांना ही दीक्षा पाळतां येणार नाही. अशांनी सत्याग्रही दीक्षेचे ढोंग करण्यापेक्षां अहिंसेचा त्याग करून क्रांतिनिष्ठेचे सत्य जिवंत ठेविले, तरी त्यांचा आणि समाजाचा त्यापासून उद्धार होईल. म. गांधीनाहि हें मान्य आहे.

मनोहर :
मार्च, १९४५